# मोठीं वर्तुळें

[ कथा संग्रह ]

लेखक

वासुदेव पोवळे.

किंमत तीन रुपये.

श्री समर्थ बुक डेपो
गिरगांव-मुंबई

प्रकाशक – रामचंद्र व्यंकटेश देशपांडे,
**श्री समर्थ बुकडेपो**
गिरगांव–मुंबई.

१ या पुढील आवृत्तीचे हक्क सौ. उषा पोवळे यांच्या स्वाधीन आहेत.
२ मुखपृष्ठावरील चित्र श्री. मुळगांवकर यांचें आहे.
१९५० नोव्हेंबर.

मुद्रक – मधुकर रघुनाथ कालेवार,
**प्रफुल्ल प्रिंन्टिग प्रेस,**
नानाशंकरशेट वाडी, गिरगांवरोड, मुंबई २.





प्रस्तुत संग्रहांतील ‘ पुरुष ’ ही कथा एका इंग्रजी कथेचं स्वैर भाषांतर आहे; व ‘देवानय्’ ही कथा श्री. राजगोपालाचारी यांच्या कथेचा अनुवाद आहे. इतर कथा स्वतंत्र आहेत.

ज्यांनीं ज्यानीं मला सहकार्याचा हात दिला त्याचा मी ऋणी आहे.

राममंदीर वाडी, माहीम. } **वासुदेव पोवळे.**

# प्रस्तावना.

माणूस प्रवासाला निघाला कीं तो टप्प्याटप्प्यानीं मुक्काम करीत जात असतो. त्या प्रत्येक टप्प्यावर मुक्काम झाला असतांना, तेव्हढ्यापुरता, त्या टप्प्याच्या वातावरणाशीं तो रंगून जात असतो. पुढचा टप्पा गांठीपर्यंत मागल्या टप्प्याची आठवण त्याच्या अंतर्मनात कुठंतरी भिरभिरत असते. नवा टप्पा गांठ· ल्यावर ती भिरभिर हळूं हळूं वितळत कांहीं वेळानें अजिबात लोप पावते.

पण शेवटचा टप्पा म्हणजे मुक्काम गांठल्यावर मागल्या साऱ्या टप्प्यांची त्याला पुन्हा एकदा आठवण होते, त्यांचा धांवतां आढावा तो घेऊं लागतो, त्या साऱ्या आढाव्याची तोंडमिळवणी करतो आणि त्या शेवटच्या मुक्कामावर ठाण मांडल्यावर मागच्या टप्प्यांची त्याची सारी आठवण, एक तर आपोआप बुजून जाते किंवा मुक्कामाची निश्चिती करण्यासाठीं तो त्या साऱ्या आठवणी पुसून तरी टाकतो.

'दीक्षा' या मोठ्या कथेंत किंवा छोट्या कादंबरींत, असेंच झाल्याचें दिसून येईल. पूर्वीच्या काळांत 'तत्र' हा शद्ब मुळींच अस्तित्त्वांत नव्हता. कथानकाच्या घडणीची चर्चा केली जाई, लेखनाच्या शैलीचीं तारीफ केली जाई किंवा कथेंतील पात्राच्या स्वभाव-रचनेची छाननी केली जाई.

लेखनाचे कांहींएक विशिष्ट तंत्र असते, आणि त्या तंत्राला अनुसरून कथा किंवा कादंबरी लिहिली जाते, असा जो आजचा दंडक आहे. तो नवा शोध आहे— आणि त्याच नव्या शोधाच्या दृष्टीनें, या प्रस्तावाच्या प्रारंभाला, या कथेच्या तंत्रामागची भूमिका विशद केली आहे.

आयुष्यांत अशाच गोष्टी घडत असतात. वास्तवतेचा अवडंबर सर्वस्वी करावयाचा, तर कोणत्याही कथेंत सुसंगत चमत्कृति येईल, अशी अपेक्षा कुणी करूं नये. कोणत्याही व्यक्तीच्या आयुष्यांत घडणारे प्रसंग एकदां घडून गेले, कीं ते बहुधा मागें पडत असतात. क्वचित् प्रसंगीं त्यांचे धागेदोरे पुढील आयुष्यांत जोडले गेले आहेत असें दिसून येते.

पण ज्यावेळीं माणसाच्या आयुष्याच्या एका विशिष्ट टप्प्यावर, कथा-लेखनाचा मुक्काम केला जातो, त्यावेळीं पूर्वी घडलेल्या प्रसंगाचा मागमूस, शेव-टच्या टप्प्यांत सांपडलाच पाहिजे, असा आग्रह धरतां येत नाहीं.

या दृष्टीने या कथेकडे पाहिले म्हणजे वाचकांची निराशा होणार नाही. केव्हां केव्हा अपेक्षा भंगातूनच जी चमत्कृति निर्माण होते, ती वाचकांच्या मनात हुरहुर उत्पन्न करीत असली तरी त्या हुरहुरीतच चमत्कृतीच्या परिणामाची सार्थकता असते. या दृष्टीनें पाहिलें असता, या कादंबरीसाठीं लेखकानें योजलेलें तंत्र इतर कोणाच्याही लेखन-तंत्रापेक्षां अगदीच वेगळें आहे असें दिसून येईल— आणि म्हणूनच नाविन्याची आवड असलेल्या माझ्या वृत्तीला तें आकर्षक वाटते.

कोणत्याही कलाकृतीला प्रचाराचा नुसता वास जरी लागला, तरी कित्येक चिकित्सकाना मूर्च्छा येते प्रचार आणि कला याचे परस्पर सबंध ज्यांना कळत नाहींत, त्याच्यावर असा परिणाम होणं सहाजिक असतं कलेचे अधिष्ठान असल्या- शिवाय, प्रचार जसा समर्थनिय ठरत नाही, तसाच तो परिणामकारक होत नाहीं किंवा आकर्षकही होत नाही

या कादंबरीच्या शेवटच्या प्रकरणात, अशा वृत्तीच्या चिकित्सकांना प्रचा- राचा वास येण्याचा संभव आहे. पण या कथेचा नायक, ज्या भिन्न भिन्न परि- स्थितींतून भिरभिरत गेला आहे, त्या परिस्थितींतून बाहेर पडून कुठेंतरी निश्चित स्वरूपात अधिष्ठित होण्यासाठीं व्यापक स्वरूपाच्या कार्यांत त्याला गुंतवून ठेवल्याशिवाय त्याच्या भरकटलेल्या मनाला थारा मिळाला नसता, आणि म्हणूनच शेवटीं मनोहरच्या उपदेशाचा जो उपयोग करून घेण्यांत आला आहे, तो कोण- त्याही दृष्टीनें अवास्तव वाटत नाही

या चिमुकल्या कादंबरीला येव्हढी मोठी प्रस्तावना करण्याची आवश्यकता मला वाटली, ती कथानकासाठीं अवलंबिलेलं नवीन तंत्र मला आवडल म्हणून. चोखंदळ चिकित्सकाला हें तंत्र कितपत पसंत पडेल, याचा निर्वाळा देण्याचं काम माझं नाही—

—एकाच शब्दात सागायचे म्हणजे ही कथा मला फार आवडली.

हाजीकासम वाडी, मुंबई,
२९-१०-१९५०.

**मामा वरेरकर.**

# प्रस्थान —

साऱ्याच गोष्टीचा मला वीट आला होता नुसती नोकरीच नाही, तर जग देखील मला नकोसं झालं होतं जगण्यांत मला आनंद वाटत नव्हता. माझ्या जीवनात माधुर्य राहिलेलं नव्हतं. नीरस, शुष्क नि निष्प्रेम जीवन चरकातून बाहेर पडणाऱ्या उंसाच्या चिपाटासारखं जीवन या जीवनाला मी कंटाळलों होतों. सकाळी उठल्यापासून, रात्रीं झोपेंपर्यंत एका ठराविक चाकोरींतून मी जात होतो. त्या चाकोरीच्या बाहेर पडणं अशक्य झालं होतं. मी या चाकोरीला वैतागलों होतों जीवनातला हा यांत्रिकपणा मला उबग आणीत असे.

ठराविक गाडी, ठराविक चेहेरे, ठराविक प्रश्न, या साऱ्या ठराविक गोष्टींनीं मला बेजार करून टाकलं होतं जीवनात विविधता नव्हती. वैचित्र्य नव्हतं. जीवनांची गति रोधली होती. म्हणूनच त्या जीवनाला सांचलेल्या डबक्याची कळा आली होती.

चार लोकासारखं मीही खाणावळींतलं कदान्न कसंतरी पोटांत ढकलत असे. ठराविक गाडी पकडून कामावर जात असे. आज वर्षानुवर्ष जें काम मी करीत आलों, तेंच काम मी करीत असे. संध्याकाळीं पुन्हां तीच ठराविक गाडी, खाणावळींतलं कदान्न नि झोंप.

गेलीं दहा वर्षे माझा हाच कार्यक्रम होता. त्यामुळें जीवनांतला तोचतो पणा मला तीव्रतेनं जाणवूं लागला होता. या यांत्रिक वातावरणापासून कुठं तरी दूर जावं असं मला वाटूं लागलं. इथं माझा कोंडमारा होत होता. मी गुदमरून जात होतो. कुठंतरी जाऊन मोकळेपणानं श्वासोश्वास करावा असं फार फार वाटत होतं मला.

मऊमऊ हिरवळीवर लोळत, दिलरुब्याच्या तारा छेडित, निर्झराच्या ममर गीताला साथ करावी, असं मला वाटे. माझं तें एक आवडतं स्वप्न होतं. त्या स्वप्नाची पूर्तता केव्हा होणार होती, ईश्वर जाणें.

मला निसर्गाची ओढ लागली होती. निसर्गाच्या सान्निध्यांत, शक्य तितका काल खर्च करावा असं मी स्वतःशींच ठरवून ठेवलं होत. पण प्रत्यक्ष तसं हातून घडत मात्र नव्हत.

तसं म्हटलं, तर या यांत्रिकपणापासून सुटणं ही माझ्या हातांतली गोष्ट होती. नोकरीच त्यागपत्र द्यायचं, नि चालूं लागायचं. इतकं सोप होतं तें. पण जायचं कुठं हा प्रश्न शिल्लक होताच कीं.

मी नोकरी सोडल्यानं कुणाचंच नुकसान होण्याचा संभव नव्हता. माझ्यावर कोणीच अवलबून नव्हतं. या जगांत माझा मीच होतो. अगदी एकटा, नि एकाकी. मला भाऊ नव्हते, बहिण नव्हती. आई केव्हां वारली तें मला माहित नव्हतं. दहा वर्षांपूर्वी मला मागें ठेऊन बाबा निघून गेले. तेव्हांपासून मी एकटा आहे.

या जगांत मला एकच सोबती होता. माझं विरगुळ्याचं एकच ठिकाण होतं. तें म्हणजे माझा दिलरूबा. दिलरुब्यावर माझं प्रेम होतं. तोच माझा साथी होता. त्याच्या संगतींत माझीं दु.खं विसरली जात. जीवनातल्या ठराविकपणाची धार बोथट होई. माझी स्वप्नं साकार होऊन माझ्या डोळ्यांसमोर नाचूं लागत.

सुमित्रेची नि माझी ओळख झाली, ती या दिलरुब्यामुळेंच.

कंटाळा आल्यामुळें कचेरींत मी गेलों नव्हतों. सारी दुपार मी बिछान्यावर लोळून घालविली होती. लोळण्याचादेखील आतां कंटाळा आला होता. चहाचा एक डोस मारून, मी दिलरुबा बाहेर काढला धनुकली तारांवर फिरूं लागली. जोगियाचे करुण स्वर बाहेर पडूं लागले. काय वाटलं कुणास ठाऊक, मी एकदम वाजवणं बंद केले. ते करुण स्वर मला ऐकवत नव्हते.

पुन्हां दिलरुबा उचलून मी मालकंस छेडायला सुरवात केली. मालकंसावरून मी भैरवीपर्यंत कसा येऊन पोंहोचलों, हें मला कळलंच नाहीं.

दिलरुबा खालीं ठेवून मी अगतिकपणें मागें मान टाकली.

'छान, छान' असं म्हणत कोणीतरी नाजूकपणें टाळ्या वाजवल्या, मी चटकन् वळून पाहिलें दरवाजांत एक मृगनयना उभी होती. सावळ्या रंगाची एक सुडौल आकृति दरवाजांत उभी होती. तिचा चेहरा लोभस होता, डोळे काळेभोर नि पाणीदार होते.

तिला 'या बसा' असं म्हणायचंदेखील भान मला राहिलं नाहीं. मी तिच्याकडे पहातच राहिलों.

"खरोखर छान वाजवतां हं तुम्हीं." तिच्या या शब्दांनीं मी भानावर आलों. चटकन् उठून मी तिला म्हटलं, "या, आंत या ना."

ती आंत आली तिचं चालणंही डौलदार होतं. त्या चालींत आढ्यता नव्हती. अवास्तव लीनता नव्हती. ती चाल लालित्यपूर्ण होती. कबूतराचा डौल होता त्या चालींत.

जवळच्या खूर्चीत बसत ती म्हणाली, "तुम्हीं, इतकं चांगलं वाजवतां हें मला माहित नव्हतं."

मी आतापर्यंत माझ्या मनावर ताबा मिळविला होता. तिच्या आकस्मिक दर्शनानें बसलेल्या धक्क्यातून मी पूर्ण भानावर आलों होतों. मी हंसतच तिला म्हणालो, "पण आतां तरी कळलं ना?"

"कळलं म्हणूनच इथवर मी आलें."

"छान, काय आहे तुमच्या मनांत?"

"एक कल्पना मला सुचलेय, पण त्यावर पुन्हां केव्हां तरी बोलूं. आतां आपली ओळख झालीच आहे म्हणा."

"हो, तशी ओळख झाली असं म्हणायला हरकत नाहीं. फक्त ती निनांवी आहे येव्हढंच."

"अरे हो, खरंच मी अगदींच विसरलें, माझं नांव सुमित्रा चिपळूणकर."

"नांव ऐकल्यासारखं वाटतं मला. कुठं नि केव्हां तें कांहीं आठवत नाहीं. मी हें नांव कुठंतरी ऐकलं आहे.'

" मी सांगते कुठं ऐकलं असेल त. मी रंगभूमीवर नेहमीं कामं करते. "

" अस्सं, आतां आलं लक्षांत. कालच एका नव्या नाटकाची जाहिरात वाचली मी. त्यांत तुमचं नांव होतं. "

" आतांपर्यंत कितीतरी नाटकांत मी कामं केलेली आहेत. "

" छान. आजचा दिवस फार भाग्याचा आहे. एका ख्यातनाम नटीची आज ओळख झाली म्हणायची. "

" पण कुणाबरोबर झाली हें नाहीं ना कळलं ? "

" कां दरवाज्याबरची पाटी नाहीं वाचलींत ? "

" इकडे आले तेव्हां माझं भान हरपलं होतं. "

" अस्सं, पण मी तुमच्या इतका प्रसिद्ध नाहीं. या चाळींतल्या लोकांना-देखील माझं नाव ठाऊक नसेल माझं नाव सुबोध हळदणकर. "

" तुमचं नाव इतकं कांहीं दुर्बोध नाहीं म्हणायचं. "

मी हंसतच स्टोव्हला काकडा लावला तिचा मोकळेपणा मला आवडला. इतक्या मोकळेपणानं, एका तिऱ्हाईताबरोबर संभाषण करणारी तरुणी मला अजून भेटली नव्हती. आमच्या तरुणी म्हणजे लाजाळूची झाडं. परका पुरुष दिसला कीं बसलीच त्यांच्या तोंडाला खिळ अगदीं पदवीधर तरुणीदेखील याच मालिकेतल्या. जितकं शिक्षण जास्त तितका हा अबोलपणा जास्त शिक्षणानं खरं म्हटलं तर जास्त मोकळेपणा यायला पाहिजे. पण आमच्या तरुणींच्या बाबतींत मात्र नेमकी उलटी प्रतिक्रिया झालेली आढळून येते. परक्या पुरुषाबरोबर बोलण्याची त्याची इच्छा नसते असं मात्र नाहीं. बोलावसं वाटतं पण ती उर्मि, त्या आंतल्या आंत दाबून टाकतात.

लोकापवादाच्या काल्पनिक बुजगावण्याला अवास्तव महत्त्व देऊन त्या आपला वंचना करीत कसतात.

त्याचमुळें सुमित्रेचा मोकळेपणा मला कौतुकास्पद वाटला.

स्टोव्हवर चहाचं आधण ठेवतांना हेच विचार माझ्या डोक्यांत घोळत होते पण मी चहा करतोय हें लक्षांत येतांच ती म्हणाली, " चहा कशाला ठेवतां ? मला आंता चहा प्यावा लागणारच आहे. "

" म्हणजे, हा चहा इथलाच ना ? "

" अहं. तसं नव्हे. अहो माझी एक मैत्रिण वरच्या मजल्यावर राहते. तिला भेटायला म्हणून मी आल्यें. इतक्यांत जिन्यावरच तुमच्या दिलरुब्यावर छेडलेले मालकंसाचे सूर ऐकूं आले. वर न जातां, मी सरळ तुमच्या खोलीकडे वळले. मला आतां तिच्याकडे गेलं पाहिजे "

" जा ना. पण झालेल्या चुकीची भरपाई करून जा "

" म्हणजे चहा पिऊन जा असंच ना ? "

" होय. जवळ जवळ तसंच. आणि हें पहा, चहा दुधाचा मिळणार आहे इथं." 

" अस्सं कां ? बरंच झालं. पण माझ्या मैत्रिणीकडे पावडर वापरतात, असं कुणी सांगितलं तुम्हाला ? "

" असं कुठं म्हणतोय मी चागला न्याय आहे हा माझ्या म्हणण्याचा तसा उद्देश नव्हता हो "

" नसेल ही मला आपलं वाटलं झालं. पण तुम्हाला एक प्रश्न विचारावासा वाटतो विचारूं कीं नको, हें काहीं ठरत नाहीं अजून "

" येव्हढंच ना ? मग विचारूनच टाका एकदम. "

" तुम्हीं इतकं चागलं वाजवायला कुठं शिकलात ! कुणाजवळ शिकलात ? "

" भास्करराव काळे म्हणून आमचे एक शेजारी होते त्यानी मला शिकवलं. ते स्वत: हुसेनखाचे शिष्य. "

"हुसेनखाची कीर्ती ऐकून माहीत आहे मला. त्याची सतार म्हणजे संगीताची मेजवानीच असं मी ऐकलेलं आहे पण या भास्करबुवाचं नाव नाहीं ऐकलं मी अजून. "

" त्याचं नांव कुणालाच माहित नाहीं. फार थोडेजण त्याना ओळखत होते, त्यांचं आयुष्य म्हणजे·· पण जाऊं द्या ते. तो एक मोठा इतिहासच आहे "

माझ्या गुरुचा इतिहास तिला सागण्यासारखा नव्हता एका कलावंताच्या आयुष्याची शोककारी कहाणी तिला सांगावी असं मला वाटत नव्हतं.

आज भास्करराव कुठं आहेत, देव जाणे. गेल्या दोन वर्षांत त्यांची कांहींच बातमी मला समजलेली नाहीं. ' कोंकणांत जातो ' असं सांगून ते गेले. ते गेलेच. भास्करराव आज कुठं असतील ! नि वृंदा !

हं. वृंदा आज स्वत.च्या संसारांत गुंग आहे. निदान ती तसं भासवित तरी असेल. माझ्यावर सूड उगविण्याकरतां, माझा पाणउतारा करण्याकरतां, तिनं मधूशीं लग्न केलं. मधूची श्रीमंती, जास्त मोलाची ठरली. वृंदा स्वतःच्या मोटारीतून फिरूं लागली. तिला माणसाची ओळख पटेनाशी झाली. स्वत.चा जन्मदाता तिला नकोसा वाटूं लागला. फाटक्या कोटानं तिच्या बंगल्यांत जाण्याचा मूर्खपणा त्यांनीं केला, हाच त्यांचा अपराध. बिचारे भास्करराव !

भास्कररावांची ती गोरीपान, कृश मूर्ति आजही माझ्या डोळ्यासमोर उभी राहते. भास्करराव म्हणजे एक गबाळग्रथी कारखाना होता गुंड्या न लावलेला नेहरू शर्ट, मळकट धोतर, वाढलेली दाढी नि डोक्याला पडलेले तुळतुळीत टक्कल म्हणजे भास्करराव. ही बावळट मूर्ति रस्त्यावरून जाऊ लागली, तर कुणालाच सशय आला नसता कीं हा एक उत्कृष्ट कलावंत आहे म्हणून. पण भास्कररावाच्या हातांत एकादी सतार द्या. खऱ्या भास्कररावांचं दर्शन मग होई.

सतारीच्या तारांवर त्यांची बोटं द्रुतगतीनं फिरूं लागली, कीं खरंखुरं नादब्रह्म निर्माण होई. नजर ठरत नसे इतक्या चपलाईनें त्यांची बोटं तारावरून फिरत. साथीला बसलेला तबलजी थकून जाई. पण भास्कररावांची गति थाबत नसे. तासन्‌तास ते सतार छेडित बसत.

त्यांचं सार शिक्षण हुसेनखांच्या जवळ झालं होतं हुसेनखाच्या चागल्या शिष्यात त्याची गणना होई. स्वतः हुसेनखादेखील त्याच्यावर निहायत खूष होते. हुसेनखांचे दुसरे शिष्य आज ‘ गायनाचार्य ’ नि ‘ गानदेवता ’ इत्यादि बिरुदावलींनी मिरवित आहेत. नि भास्करराव आज रानोमाळ फिरत आहेत. अज्ञात नि एकाकी.

जग निर्माण करणाऱ्या ब्रह्मदेवालादेखील मधून मधून अमृताचे घुटके पिण्याची लहर लागत असे. बेहोष ताडव-नृत्यकरण्यापूर्वी, सोमरसाचे चषक शंकराला घशांत रिचवावे लागत. पण भास्करराव ह्याबाबतींत अगदींच सोंवळे होते. त्याना सुपारीच्या खांडाचंदेखील व्यसन नव्हतं. कलावंत व्यसनी असतात हा प्रवाद ह्यांच्या पुरता तरी निराधार होता. पण भास्कररावांना कलावंत म्हणून म्हणणारे कोणीच नव्हते. एक ससारी कुटुंबवत्सल कारकून याच दृष्टीनं जग त्यांना ओळखित होतं.

ते स्वभावानं फारच शांत नि सोशिक होते. सांबराच्या शिंगाप्रमाणेंच त्यांच्या या स्वभावानें त्याचा घात केला. संघर्ष उत्पन्न होऊंच द्यावयाचा नाहीं, असं त्यांचं वर्तन होतं. स्वतः पड खायची, स्वतः झीज सोसायची, पण संघर्ष टाळायचा. त्यांच्या या स्वभाव विशेषामुळेंच त्यांच्या आयुष्याची वाताहात झाली.

भास्करराव जर संसारांत पडले नसते तर त्यांच्या कलेचा विकास झाला असता. एक उत्कृष्ट सतारवादक आम्हांला दिसला असता. विलायतखांच्या मांडीला मांडी लावून त्यांनीं आपलं वादन कौशल्य दाखविलं असतं. अंकुरलेली कला सावटामुळें करपून गेली. कलेचा खून झाला नि कारकुंडा शिल्लक राहिला.

पत्नी ही पतीची सावली असते. पण हीच सावली भास्कररावांच्या अंकुरलेल्या कलेवर पडली, नि तें रोपटं जळून गेलं.

भास्करराव जर थोडेसे कणखर असते तर ? साराच इतिहास मग बदलला असता.

वडिलांच्या आग्रहाला बळी पडून त्यानीं लग्न केलं. लग्न झालं नि वडिल वारले भास्कररावांच्या संसाराचे धिंडवडे पाहण्याकरता ते थांबले नाहींत.

संसाराची जबाबदारी भास्कररावावर पडली. कला संभाळून, संसार संभाळणं भास्कररावांना अशक्य नव्हतं. पण भास्कररावाच्या पत्नीला, त्याचं तें तुणतुणं वाजवणं मान्य नव्हतं. नवऱ्यानं चार लोकांसारखी नोकरी करून पैसा मिळवावा, दागदागिने नि पातळं लुगडीं खरेदी करावीत, अशी तिची इच्छा होती. तिच्या दृष्टीनं सतारीचं तुणतुण हें भिकारीपणाचं लक्षण होतं. तिला डोळे होते पण कान नव्हते. दागिन्यांची दीप्ती नि लुगड्यांची रंगसंगती तिच्या नजरेंत पटकन् भरत असे. पण भास्कररावांनीं सतारीवर छेडलेली एकादी चीज तिला एकतारीवर भजन गात फिरणाऱ्या भिकाऱ्यासारखींच वाटत असे.

भास्कररावांच्या थंड स्वभावानं हार खाल्ली. त्यांना संघर्ष नको होता. सतार गवसणींत ठेऊन त्यांनीं लेखणी हातांत घेतली. कलावंताचा मृत्यु नि कारकूनाचा जन्म एकाच क्षणीं झाला. हुसेनखांचे लाडके शिष्य ही आठवण पार बुजून गेली. हुसेनखांच्याबरोबर काढलेल्या एका जुनाट फोटोशिवाय कांहीं मागं राहिलं नाहीं.

भास्कररावांची नि माझी ओळख झाली, ती वृंदेमुळेंच. वृंदा ही भास्कररावांची मुलगी. वृंदा माझ्याच वर्गांत होती. तिच्यामुळें मी भास्कररावांकडे जाऊं येऊं लागलों.

आमच्या बाबाना नाटकाचा फार षोक होता. जुनें नट नि नाटकं ह्यांची रसाळ वर्णनं मी कितिकदा त्याच्या तोंडून ऐकली आहेत दाते, औंधकर, पेंढारकर, बालगंधर्व, इत्यादि ख्यातनाम नटवर्यांचीं, त्यांच्या ऐन उमेदींतली कामं बाबाच्या संगतींत मी पाहिली होती त्याचमुळें बाबांचा नि भास्कररावांचा स्नेह संबंध वाढतच राहिला

लवकरच जागा बदलून आम्ही भास्कररावांच्या शेजारी राहण्यास गेलो. मला हें स्थलांतर फारच आवडलं. कारण आता वृंदेच्याबरोबर दिवसभर मला गप्पा गोष्टी करायला मिळाल्या असत्या.

मला दुसरी भावडं नव्हती. त्यामुळें मी लाडांत वाढलों होतो. बाबाही माझे लाड पुरवायला कमी करीत नसत त्याना मी लहानच वाटे बाबा वारले त्यावेळीं मी अठरा वर्षाचा होतो. पण आपल्या मृत्युपर्यंत त्यानीं माझा वाढदिवस साजरा करण्याचा क्रम कधींच सोडला नाहीं.

वाढदिवसाचा हा कार्यक्रम विशेष डामडौलाचा असे असं मात्र नाहीं. उलट घरांत कोणी बाई मनुष्य नसल्यामुळें साऱ्याच गोष्टी बाजारांतून विकत आणाव्या लागत. थोडीशी मिठाई, चार पाच प्रकारची फळं कॉफी नि मला एकादी सुंदरशी भेट. बाबाचे दोन चार स्नेही येत. भास्करराव असतंच वृंदा आणि माझे एकाददोन शाळासोबती बस्स यायचं खायचं कॉफी करायची नि फोनोच्या रेकार्ड लावीत पत्ते कुटीत बसायच हा त्या दिवसाचा कार्यक्रम असे

माझा शेवटचा वाढदिवस अजूनही माझ्या स्मरणांत आहे बाबाच्या हयातींत झालेला तो शेवटचा वाढदिवस होता. आम्हीं नुकतेच भास्कररावांच्या शेजारी राहण्यास आलो होतो. याच वाढदिवशीं बाबांनीं मला हा दिलरुबा भेट म्हणून दिला. भास्कररावांचं सतार वादनांतलं नैपुण्य त्याच दिवशीं मला पहाण्यास मिळाले.

बाबा तर नुसते डालत होते. सतार थांबतांच बाबांनीं उठून भास्कररावाना आनंदानं मिठी मारली. ' शाबास भास्करराव, तुम्हीं आज कमालच केलीत " अस म्हणत बाबांनीं मला भास्कररावांच्या समोर उभा केला. 'भास्करराव' बाबा म्हणाले "या पोराला तयार करा. त्यानं कांहीं तरी शिकावं अशी माझी इच्छा होती. आज त्याला पाहिजे तो गुरु मिळाला "

" जरूर शिकविन. मी विद्या हस्तगत केली, ती एकाद्या सत्पात्री शिष्याला देण्याकरतांच. आमच्या पोरीला शिकवणार होतो. पण—" भास्कररावांनीं वाक्य अर्ध्यांवरच सोडलं.

भास्कररावाविषयींचा माझा आदर आतां दुपटींनं वाढला. वृंदेचे वडिल म्हणून मी त्यांना मान देतच असे. पण आंता ते माझे गुरूही झाले होते.

त्यानतर लवकरच बाबा वारले. मी एकटा पडलों. कॉलेजला मी रामराम ठोकला आता शिक्षणांत मला गोडी राहिली नव्हती. माझ्या शिक्षणाच कौतुक करायला कोणी राहिलं नव्हतं.

म्हणून शिक्षण बंद करून मी नोकरी धरली. भास्करराव मला धीर देत. बाबाची मला आठवण होऊं नये इतके माझ्यासाठीं ते झटत शिक्षण चालूं ठेवण्याचा त्याचा सल्ला मला मानवला नाहीं. वाहती गंगा आटली होती. आंता शिकायचं कशाच्या जोरावर ? बाबांनीं थोडीशी पुजी ठेविली होती. नाहीं असं नाहीं. पण त्या दहा हजारातले पाच हजार शिक्षणाकरता खर्चून, पुढें काय करायचं तर नोकरीच. मग आतांच नोकरी धरलेली काय वाईट ?

माझा हा युक्तिवाद पटला म्हणून असो किंवा इतर कांहीं कारणं असोत, पण भास्कररावांनी पुन्हा शिक्षणाची गोष्ट माझ्याकडे काढली नाहीं. मात्र बाबाना दिलेलं वचन त्यांनीं पुरेपुर पाळलं. दिलरुब्यावरची माझी कसरत चालूंच होती.

भास्करराव मन लावून मला शिकवित होते. माझा सारा रिकामा वेळ मी मेहनत करत खर्च करीत असे. त्यामुळें भास्कररावांच्या अपेक्षापेक्षांही जास्त अगोदर मी तयार होऊं लागलो होतो.

दिलरुबा हस्तगत झाला, पण वृंदा मात्र माझ्या हातांतून सटकली.

वृंदा म्हणजे तिच्या आईच्या गुणदोषांचा एक अर्क. आईचं रूप आणि आईचे दोष, तिनं सहीन् सही उचलले होते. कांचनाची झळक तिला लोभनीय वाटत होती. रुपयाचा खणखणाट तिला नादमधूर वाटे. सतारींच्या तारा छेडण्यापेक्षां तरूणांची हृदयं छेडणें तिला अधिक प्रिय होत. गरिबीचा उपहास करण्यात तिला आनंद वाटत असे

शिक्षण बद करून, मी नोकरी धरली ही गोष्ट तिला मान्य नव्हती. पुष्कळ शिकून, खूप मोठी नोकरी मी पकडावी अशी तिची अपेक्षा होती पण माझं म्हणणं ऐकून घेण्याची तिची तयारी नव्हती. तिला मी नको होतो. पैसा पाहिजे होता. दागदागिने पाहिजे होते. मोटार पाहिजे होती.

माझे सारे गुण तिला दुर्गुणासारखे वाटूं लागले. माझा साधेपणा, तिला भिकारी लक्षणाचा वाटू लागला

भास्करराव वृंदेकडे लक्षच देत नसत. ती आपल्या आईच्या कलानें वागत असे. घरांत भास्कररावांच्या शद्बांना किंमत नव्हती. भास्कररावांची व्याकूलता मला समजत होती. त्यांचा अगतिकपणा मी जाणून होतो वृंदेनें माझ्याबरोबर विवाहबद्ध व्हावं अशी त्यांची इच्छा होती. पण त्यांच्या इच्छेला कोणी जुमानणारं नव्हतं. वृंदेच्या नि वृंदेच्या आईच्या दृष्टीनं मी भिकारडा होतो.

भास्करराव नि मी त्या दृष्टीनं समदु:खी होतो. म्हणून आम्हीं आमचा जास्तत जास्त वेळ दिलरुबा छेडण्यांत खर्च करीत असूं

याच सुमारास वृंदेची नि मधूची ओळख झाली. मधूची श्रीमंती दिपवणारी होती. दारांत मोटारी झुलत त्याच्या. आलमिरे कपड्यांनीं भरलेले होते. गालिच्याच्या पायघड्या पसरलेल्या होत्या. हांकेसरशीं हात जोडून नोकर सेवेला हजर राहत असे. त्या झळाळीनं वृंदा दिपली. वृंदेची आई हरखली. हव्या असलेल्या जांवयाचा शोध त्यांना लागला.

वृंदा मूळचीच सुंदर. त्यांत आतां नखरेलपणाची थोडी छटा मिसळून दिली होती. त्यामुळें तिचं सौंदर्य एकदम उठून दिसायला लागलं. पैलू पाडल्यावर हिऱ्याचं तेज फांकतं. तसं वृंदाचं सौंदर्य आतां प्रभावशाली होऊं लागलं. मधू मोहनास्त्राला बळी पडला.

पण जांवयाचा हा मोर्ता भास्कररावांना नाकापेक्षां जड झाला. त्यांत वृंदेच्या आईची उधळपट्टी. बडेजावीची हौस. भास्करराव टेकीस आले.

लढाई संपली तरी महागाई कमी झाली नव्हती. उलट ती वाढतच होती. मिळणाऱ्या पैशांत अन्नूनं दिवस कसे घालवावे हाच प्रश्न प्रत्येकाला भेडसावित होता. भास्कररावांचें पुढेंही तेंच प्रश्नचिन्ह होतं. त्यांत वृंदेच्या लग्नासाठीं झालेला खर्च तें कर्ज फेडणं भागच होतं. देणेकरी घरीं, दारीं, ऑफीसांत भेटतील तिथं तगादा लावित. उधळपट्टी करणारे नामानिराळे राहिले होते बिचाऱ्या भास्कर-रावांना मात्र त्यांनीं वाघाच्या जबड्यात लोटून दिलं होतं

वैतागून गेलेल्या भास्कररावांनीं नोकरी सोडून दिली मिळालेल्या फंडानें देणेकऱ्यांची तोंड बंद केली.

या साऱ्या घटनाचे परिणाम भास्कररावावर फारच झाले. त्यांचा उत्साह त्याना सोडूनच गेला. ते एकदम म्हातारे दिसूं लागले. माझंही शिक्षण आतां संपुष्टांत आलं होतं दररोज येणारे भास्करराव शेजारी असूनही आतां कधीं मधीं येऊं लागले. मी वृंदेच्या लग्नापासून त्याच्याकडे जाणं येणं सोडलंच होतं. जातां येता कधीं गाठ पडली, तर मी मुद्दाम त्याना बोलावून घेत असे. पण भास्करराव आतां फारच अबोल झाले होते.

नोकरी सोडलेली, खिशांत एक पैसाही नसलेली भास्कररावांची दीनवाणी मूर्ति नोकरीच्या शोधार्थ मुंबईभर भटकत असे. असेच भटकतांना, ते एकदां वृदेच्या घरीं गेले. पण त्यांचा तो 'अवतार' पाहतांच वृंदेनें त्यांना घराबाहेर काढलं.

प्राण गेला तरी डोळ्यांतून टिप न काढणारे भास्करराव एकाद्या लहान पोरासारखे ढसढसां माझ्याजवळ रडले, त्या दिवशीं.

त्यांतच वृंदेच्या आईच्या आजारीपणाची भर पडली, त्या आजारांतून ती पुन्हां उठलीच नाहीं. जणूं काय भास्कररावाचा झाला इतका छळ पुरे झाला असंच तिला वाटलं असेल.

तिच्या मृत्युनंतर भास्कररावांनीं सारं कांहीं विकून टाकलं. बिलं चुकती केली. नि सतार घेऊन ते निघून गेले, जातांना ते म्हणाले, "मी कोंकणांत जातो. गांवीं जाऊन कुलदेवतेचें दर्शन घेईन, नि कुठंतरी एकाद्या देवळांत बसून परमे-

श्वराला आळवित बसेन. मी जातों आता. तूं सज्ञान आहेस. गुरु म्हणून तुला कांहीं सागणं मला जमणारही नाहीं माझं बरं वाईट जीवन तुला माहित आहेच, त्यांतून योग्य तो बोध घे. जातो मी."

भास्कररावाच्या पायांवर मी मस्तक ठेवलं नि हातांत दहा दहाच्या दहा नोटा ठेवल्या. पण त्यानीं त्या माझ्या हातीं परत दिल्या. फक्त दोनच नोटा उचलून ते निघून गेले.

माझ्याकडून त्यानीं हे पहिलेच नि शेवटचे पैसे घेतले.

त्यानंतर भास्कररावांची कांहींच हकिकत मला कळली नाहीं.

—आणि ही सारी कुळकथा मला सुमित्रेला सांगाविशी वाटत नव्हती. भास्करावाना मी माझ्या कुटुंबांतले मानित होतों. आपली गृहछिद्रं परक्याना उघडी करून दाखविण मला कमीपणाचं वाटत होतं. सुमित्रा मला अजून परकीच होती. आताच काहीं वेळापूर्वी ती माझ्या आयुष्यात आली. एकाद्या धूमकेतूसारखी ती माझ्या जीवनात अचानक उगवली आहे, कदाचित आली तशी निघूनही जाईल जीवन सागरातले आम्ही सहप्रवाशी आहोंत. पण आमची प्रवासाची उद्दिष्टं वेगवेगळी असूं शकतील.

वृंदा अशीच माझ्या जीवनाकाशात आली. क्षणभर मला भास झाला कीं ती माझ्यासाठींच आहे. आमचे जीवनप्रवाह एकजीव होतील असं मला वाटत होतं. पण मधेंच मधूचा खडक आला नि मी वेगळा पडलों. एकाकी पडलों.

त्या दिवसांपासून मी एकटाच आहे. मला कुठं जावंस वाटत नाहीं. कांहीं करावंस वाटत नाहीं. वृंदा गेली नि जणू काय माझी उत्साहशक्तीच आटून गेली. ती गेली, नि निष्क्रीयतेचं लेणं माझ्या अंगाखाद्यावर ठेऊन गेली.

सुरवातीलाच मला एक मर्मान्तिक टोला बसला होता त्या धक्यांतून मी अजून पूर्णपणं जागा झालों नव्हतो. जागृती नि झोंप याच्या सीमारेषेवर मी अजूनही रेंगाळत होतों

नि अशा वेळीं सुमित्रेचा प्रवेश माझ्या जीवनांत होत आहे. हें एकादं स्वप्न तर नाहींना असं अजूनही मला वाटतं. पण सुमित्रेबद्दल आजच अंदाज बाधणं फाजील आशावादी तर नाहींना ठरणार? आमचा परिचय आतांच कुठं

झाला आहे. तोही किती योगायोगानं. अजून तिची पुरी ओळखही झाली नाहीं, तोंच वेड्यासारखा मी तिच्याबद्दल विचार करीत बसलोंय.

माणसाचं मन किती चंचल असतं. वृंदेची आठवण मला दररोज होत असे. तिची आठवण झाली नाहीं असा एकही दिवस मला आठवत नाहीं पण सुमित्रा आली नि वृंदा मागें पडली.

सुमित्रा नि वृंदा ! नकळत माझं मन या दोघींची तुलना करू लागते. वृंदा गोरी होती, तर सुमित्रा काळीसावळी आहे पण सुमित्रेचा रेखिव डौलदारपणा वृंदेच्या वाट्याला आला नव्हता नि सुमित्रेचे ते काळेभोर नेत्र. सुमित्रेचं सारं सौंदर्य त्या नेत्रांत साठवलं होतं ते हरणासारखे चंचल नि पाणीदार नेत्र त्या डोळ्यानी मला वेड केलं होतं वृंदेचं सौंदर्य उन्मादी होतं. सुमित्रा म्हणजे पौर्णिमेची शीतल ज्योत्स्ना दाहक शीतलता. दीपशिखेची दिप्ती लेवून वृंदा अवतरली होती; तर चंद्राच्या दाहक शीतलतेची चोरी करून सुमित्रा पळून आली होती. एकीचं सौंदर्य उन्मादी होतं, तर दुसरीचं सात्विक होतं एकीच्या फक्त आठवणीच शिल्लक राहिल्या होत्या; नि दुसरी आताच माझ्या जीवनांत प्रवेश करीत होती.

× × × ×

दारांतच सुमित्रेची चिठ्ठी मला मिळाली. गेले चार दिवस मी तिचीच मार्ग प्रतिक्षा करीत होतो या चार दिवसात ती एकदासुद्धा फिरकली नव्हती. नि आज मी घरीं नसताना येऊन गेली ती. मला वाटलं, मी उगीच कामावर गेलों. मी घरीं असतों तर तिची गांठ पडली असती.

तिच्या भेटीसाठी मी आतूर झालों होतो. मी तिच्यासाठीं आसावलों होतो. आतांपर्यंत मी जगापासून दूर होतो. ही तुटलीक मीच निर्माण केली होती. चार भिंतीच्या पिंजऱ्यांत मीच स्वत ला कोंडून घेतलं होतं. पण ह्या पिंजऱ्याचं दार अचानक उघडलं गेलं. बाहेरच्या जगाचं अस्पष्ट दर्शन मला झालं. ते अनोळखी जग. अनोळखी नि उत्साही. मी वेडावून गेलों.

आतांपर्यंत मी आत्मवंचना करीत आलों, माझं मन मारीत आलों. वृंदेनें झिडकारल्यापासून तरुण स्त्री झरळासारखी झटकीत आलों मी त्यांना मी टाळींत

होतों. तरुण स्त्रियांशीं संबंध न येईल याबद्दल जागरूक होतों. पण सुमित्रा अचानक आली. एका बेसावध क्षणीं आली, आणि मी लादून घेतलेली कृत्रिम बंधनं तटतटां तुटली.

मला तिच्याबद्दल आसक्ती वाटूं लागली. खाणावळींतल कदान्न खाऊन कंटाळलेल्या जीवाला सुगृहिणीनं केलेल्या सुग्रास जेवणाची अभिलाषा उत्पन्न होणं हें नैसर्गिक असतं. माझी आसक्ती तितकीच नैसर्गिक होती. त्यांत अवास्तव कांहींच नव्हतं. निदान मी माझी अशी समजूत घालीत असे या युक्तिवादानं मी माझ्या मनाला शांत करण्याचा प्रयत्न करीत असे. तिच्या अभिलाषेची आत्यंतिक इच्छा, निसर्गाला इरेस टाकून मी दडविण्याची कोशीस करीत होतो.

सुमित्रेला हेलपाटा पडला, म्हणून मी उगीचच खट्टू झालों होतों. वस्तुतः तिला हेलपाटा पडला ही चूक माझी नव्हती. तिला हेलपाटा पडावा अशी माझी इच्छाही नव्हती. उलट माझी भेटण्याची वेळ कोणती असते, मी खोलीवर केव्हां येतो, याची चौकशी तिनंच करावयाला हवी होती, चूक तिचीच होती. पण मी विनाकारणच मनाला लावून घेत होतो.

ती भेटल्यावर, हेलपाटा पडल्याबद्दल, प्रथमच दिलगिरी प्रदर्शित करायची असं मी ठरवूनच टाकलं. पण ती शनिवारपर्यंत भेटणार नव्हती. शनिवारीं दुपारीं येतें, असं तिनं चिठ्ठींत लिहिलं होतं. शनिवारपर्यंत मला वाट पाहणं भागच होतं. केव्हां उजाडणार हा शनिवार ?

शनिवारला अजून दोन दिवसांचा अवधि होता. संपूर्ण दोन दिवस मध्यें होते. अठ्ठेचाळीस तास. एकेक तास युगासारखा वाटत होता मला. अशी अठ्ठेचाळीस युगं मला घालवायची होती. जीव टांगल्यासारखा वाटत होता मला. घड्याळांतील लंबकासारखं मन हिंदळत होतं. जिवाला स्वस्थता नव्हती. स्थिरता नव्हती.

मी पार बदलून गेलों होतों. माझ्यांतला हा बदल मला जाणवत होता. सुमित्रा या बदलाला कारण होती. तिच्यामुळें माझ्यांत हा बदल होत होता. वृंदेच्या नकारानं मी जायबंदी झालों होतों. एकाद्या जखमी श्वापदासारखा, मी चार भिंताडाच्या माझ्या गुहेंत पडून होतों. सुमित्रा बेडरपणें तिथं आली. वृंदेचा अहंकार तिच्यांत नव्हता. वृंदेचा ताठरपणा तिच्याजवळ नव्हता. सुमित्रा लीन होती. तिच्यांत सौजन्य होतं. गुणांचं रसग्रहण करण्याइतकी ती रसिक होती.

वृंदा फक्त माझ्या दोषांवर प्रहार करीत असे. माझे गुण तिला दिसले नाहींत. पण सुमित्रा माझ्या गुणांची चाहती आहे. दिलरुबा वादनांतलं माझं कौशल्य मला अजून अज्ञात होतं. वृंदेनें माझं कधींच कौतुक केलं नाहीं. पण सुमित्रेमुळें माझ्या कौशल्याची जाणीव मला झाली. एक नवं क्षितिज तिनं मला दाखवलं. गंजत पडलेली माझी कार्यशक्ति तिनंच चेतवली. एक नवा उत्साह, एक नवा जोम आज माझ्यांत उत्पन्न झाला आहे. सुमित्रा माझी उत्साह देवता बनली आहे.

तिचा अजून पूर्ण परिचयही झालेला नाहीं. तिच्याबद्दल कसलेही अंदाज करणं आज शक्य नाहीं. पण ती आली नि माझ्यांत एक नवी ईर्षा उठवून गेली. तिचं हें ऋण कबूल करणं भागच आहे.

सुमित्रा त्या दिवशीं आली नसती, तर मी निष्क्रीय बसलों असतों. माझ्यांतल्या कौशल्याची जाणीव मला झालीच नसती. पण आज मला वाटूं लागलेय कीं, स्वस्थ बसण्यांत अर्थ नाहीं. मैदानांत उतरलं पाहिजे. स्पर्धेची कसोटी आपल्या कौशल्याला लागलींच पाहिजे. स्पर्धेत आपण यशस्वी होऊं असा आत्म विश्वास मला वाटूं लागला होता. ही ईर्षा सुमित्रेमुळेंच माझ्यात निर्माण झाला होती.

म्हणूनच गेल्या चार दिवसांत ती न आल्यामुळें मला रुखरुख वाटत होती ती यावी अशी माझी इच्छा होती, अपेक्षा होती, पण; होत होतं अगदीं उलट. म्हणून मी थोडासा निराश झालों होतों. खट्टू झालों होतो.

दोनच दिवसानीं येणारा शनिवार म्हणूनच मला फार दूरचा वाटत होता. तिनं दररोज माझ्याकडे यावं, दररोज निरनिराळे राग तिला दिलरुब्यावर छेडून दाखवावेत, अशी माझी इच्छा होती. माझी अधिरता म्हणूनच कळसाला पोचली होती.

कबूल केल्याप्रमाणे सुमित्रा शनिवारीं आलीच. पण ती एकटी नव्हती. तिच्याबरोबर एक तरुण होता. केंसांची झुलपं नि लांब कल्ले तो नाटकी असावा असच सुचवित होती. अंगांत एक गरम कोट होता त्याच्या. तोंडांत जळकी सिगारेट नि खांकोटीला चार दोन नाटकाची पुस्तकें असा त्याचा थाट होता. प्रथम दर्शनीच त्याच्याबद्दल माझा ग्रह अनुकूल झाला नाहीं. मला कशाची चीड आली होती, हें कांहीं मला सांगतां येत नव्हतं. ती केसांची झुलपं, तोंडांतली

सिगारेट यापैकीं एकही मला आवडलं नाहीं. या मनुष्यानं माझ्या खोलींत पाऊल टाकूं नये, असं मला वाटूं लागलं. जणूं काय माझ्या खोलींतलं पावित्र्य, त्याच्या अस्तित्वामुळें कलंकित होत होतं. पण तो सुमित्रेबरोबर आला होता. त्यामुळें मला सारे शिष्टाचार पाळणं भाग होतं. हंसून बोलून वेळ साजरी करणं माझं कर्तव्य होतं.

माझ्याकडे एकच खूर्ची होती. त्या खूर्चीवर तो बसला. कॉटवर माझ्याजवळ बसत सुमित्रा म्हणाली, 'बरं कां, सुबोध, हे आमचे दिग्दर्शक बबनराव" नि माझ्याकडे वळत ती म्हणाली, "नि हे मिस्टर हळदणकर."

नमस्कार करणं मला भागच होतं.

सुमित्रेच्या सांन्निध्यामुळेंच मी बबनरावांच्या प्रश्नांना योग्य ती उत्तरं देऊं शकत होतो. एरवी मला वाटतं, मी त्याला केव्हाच वाटेला लावला असता, पण माझ्या तुसडेपणामुळें सुमित्रेला वाईट वाटलं असतं, अशी मला भीति वाटत होती. नि सुमित्रेला दुखविण्याची मला इच्छा नव्हती पण सुमित्रा बबनरावाशीं ज्या मोकळेपणानें बोलत होती, तो मोकळेपणा, ती सलगी मला आवडली नाहीं. जणूं काय त्याच्याबद्दल सूक्ष्म असूया माझ्या मनात उत्पन्न झाली होती. सुमित्रेनं त्याच्याबरोबर इतक्या सलगीनं बोलं नये अस मला वाटत होतं पण माझं हें वाटणं अगदींच वेडेपणाचं होते. त्यात स्वार्थ होता, अहंकार होता.

बोलण्याचं काम सुमित्राच करीत होती. मी होयबाचं काम करीत होतं. बबनरावही बराच गोष्टीवेल्हाळ होता. मी हें केलें, नि मी असं करणार आहे, असलं मीपुराण तो सागत होता. त्याचमुळें माझा तुटकपणा कुणाच्याच लक्षात आला नाहीं.

पण आतां बबनरावांची नजर एकदम माझ्याकडे वळली, "हें पहा हळदणकर" ते माझ्याकडे वळून म्हणाले, "तुम्हीं आमच्या क्लबवर या एकदां. दिलरुबा घेऊनच या. आमच्या नव्या नाटकांत आम्ही ऑर्केस्ट्राची साथ द्यायचं ठरवलं आहे. तुमचा उपयोग होईल आम्हांला"

"कुणाचं आहे हें नाटक?" मी विचारलें.

" नाटक एकदम नवीन आहे. लेखकही नविनच आहे. पण नाटक नुसत्या गाण्यांवर आम्ही मारून नेऊं. अशा मस्त चाली दिल्या आहेत मी, कीं नुसत्या ऐकतच रहाल. "

" छान. म्हणजे तुम्हांला गाण्याचं देखील अंग आहे ! "

" अहो गाणंच काय, पण नृत्यदेखील मी शिकवतो. उगीच नाहीं डायरेक्टर म्हणून मिरवित. "

" तुम्ही स्वतः काम करतां कीं नाहीं ? "

" होय तर. उद्यां या ना माझं काम पहायला. उद्यां आमचं भावबंधन आहे. मी घनश्याम नि सुमित्रा लतिका. जरूर या. शिवाय डायरेक्शन माझंच "

" जरूर येईन मी. "

"हें पहा, हळदणकर, तुमची साथ जर आम्हांला पसंत पडली, तर मी भरपूर काम देईन तुम्हांला. अहो, गेला बाजार डझन दीड डझन नाटक वेळेला मी डायरेक्ट करतो. तेव्हा तुम्हीं निर्धास्त असा. तुम्हीं सुमित्रेचे मित्र. तेव्हा तुम्हाला जरूर चान्स. "

अटरा नाटकाच्या दिग्दर्शकाला जिन्यापर्यंत पोंहोचवून मी परत फिरलों. सुमित्रा त्याच्याचबरोबर गेली तिच्याजवळ बोलायची माझी फार इच्छा होती. पण या दिग्दर्शकामुळें ती सफळ झाली नाही. मला तर सुमित्रेचा राग आला होता. कशाला ही धोंड तिनं बरोबर आणली ? माझा फायदा व्हावा हाच तिचा हेतू होता. पण मला तो फायदा वाटत नव्हता. मला पैसा नको होता प्रासिद्धि नको होती. मला सुमित्रेचा सहवास हवा होता. पण हें तिला माहित होतं कां ? माझी व्याकुलता तिला जाणवली होती कां ?

सुमित्रा झटत होती माझ्या कल्याणासाठींच. मला प्रासिद्धि मिळावी मी पुढं यावं हीच तिची इच्छा होती. त्या इच्छेचं अधिष्ठान मला माहित नव्हतं.

बबनरावबद्दल प्रथमदर्शनींच जो ग्रह मी करून घेतला होता, तो मात्र चुकीचा ठरला. माझ्या अंदाजाप्रमाणें तो आढ्यताखोर नव्हता. घमेंडी नव्हता. बराचसा गोष्टीवेल्हाळ, पण स्वभावानं शांत नि मनमिळावू होता. जाताना, त्यानं मला तीन तीनदां बजावलं, कीं उद्यां नाटकाला या म्हणून. मला जास्त आग्रहाची जरूरी

नव्हतीच. सुमित्रा नाटकांत काम करणार होतीच. येव्हढं आकर्षण मला पुरं होतं पण हें माझं गुपित होतं. तें बबनरावाला काय पण खुद्द सुमित्रेलादेखील माहित असेल कीं नाहीं, याबद्दल मी साशंक होतों.

गडकऱ्यांची सारींच नाटकं मला आवडतात. पण त्यांतल्या त्यांत भावबंधन मला जास्त प्रिय होतं. बलवंत संगीत मंडळीचं 'भावबंधन' अगदी हातखंडा नाटक होतं. आपल्या कीर्तीला साजेल अशाच थाटांत त्याचें रंगभूमीवर प्रयोग झाले होते. चिंतामणराव कोल्हटकरांची घनश्यामची अमर भूमिका आजही माझ्या डोळ्यासमोर उभी राहते. घनश्यामाच्या भूमिकेची सारी वैशिष्टें ते इतक्या सुलभेनं नि सफाईनं दाखवित कीं जणूं काय खराखुरा घनश्यामच रंग लावून स्टेजवर उभा केला आहे,

अभिनयाची ही सहजता मी बबनरावापासून अपेक्षित नव्हतो. पण अठरा नाटकाचा हा डायरेक्टर कांहींतरी चांगलं काम करील अशी माझी अटकळ होती. तीही फोल ठरली. बबनरावाला भूमिकाच समजली नव्हती. नक्कल कुणाचीच पाठ नव्हती सारें नाटक प्रॉम्प्टींगवरच झालें. त्यामुळें रंगभूमी ओस पडून पात्रं विंगच्या आश्रयाने आपली भाषणं प्रेक्षकांना ऐकवित होती. सारं लक्ष प्रॉम्प्टरकडे असल्यामुळें, पात्रांना अभिनयाकडे लक्ष देण्यास फुरसत मिळत नव्हती. पण गाण्याच्या वेळीं तीं समोर येत. गाण्याच्या चाली अगदीं उडत्या नि उथळ होत्या. पण त्यांतल्या त्यांत सुमित्रेची पदं ठीक झाली. तिचा आवाज गोड होता. पण नुसत्या गोड आवाजावर गाणं रंगत नाहीं. त्याला गाण्याची माहिती असावी लागते. मेहनत करावी लागते.

या गोष्टी मी सुमित्रेला सांगितल्याच. गाणं शिकायची तिचीही इच्छा होती. पण दिग्दर्शक बबनरावांच गाण्याचं ज्ञान, सिनेमांतल्या रेकॉर्ड पलीकडे जात नव्हतं. 'रतन' बोलपटांतली पदं लोकप्रिय झाली ना, मग उचला त्या चाली. खजांची तली अमकी चाल लोकांना आवडते, तर घुसडा एक पद त्या चालीवर. हीच बबनरावांची संगीताची कल्पना होती. लोकाना संगीत आवडतं, म्हणून पदं घुसडायची. त्या पदामुळें रसभंग होतो किं नाही याकडे लक्षच नसतं यांचं. मूर्छित पडलेल्या नायकाला शुद्धीवर आणायचं सोडून नायिका खुशाल तानाची मैफल सोडित असते.

हे असले प्रसंग पाहिले कीं वाटतं, हे असले तमाशे पाहण्यापेक्षां, घरीं स्वस्थ बसलेलं काय वाईट !

रंगभूमीच्या आजच्या अनवस्थेचीं कारणं कोणती, याबद्दल विद्वानांतही मत-भेद आहेत. पण संगीताचं रंगभूमीवरील अतिक्रमण रंगभूमीला नक्कीच मारक झालं आहे संगीताच्या मृगजळामागं लागलेली रंगभूमी, अभिनयाला विसरून गेली. अभिनय हा तर रंगभूमीचा प्राण आणि म्हणून आजची अनवस्था रंगभूमीच्या वांट्याला आली दाते, ओंधकर, कोल्हटकर, बोडस, पोतनिस इत्यादि गद्य नटांनीं ज्या अभिनयाचं स्वरूप महाराष्ट्राला दाखवलं, ते अभिनयाचं स्वरूप आज दुर्मिळ झालं आहे.

नाटकासाठीं नट निर्माण होण्याऐवजीं नटांसाठीं नाटकं लिहिलीं जाऊं लागलीं. मुख्य नट गाणारा असला कीं त्याच्यासाठीं रसभंगाची पर्वाही न करतां पदं घुस-डलीं गेलीं नाटकांतलं नाट्य मारलं गेलं, नि संगीताचं बांडगूळ मात्र फोफावलं वामनराव पोतनीसासारखा अभिनय कुशल नट, गळा नसल्यामुळें मागं पडला. नि थोड्याश्या चांगल्या गळ्याच्या भांडवलावर, तिसऱ्या दर्जाचें नट नटवर्य नि नट सम्राट या बिरुदावलींनीं मिरवूं लागले ही चूक आजची नव्हती पण आज त्या चूकीचें घोर परिणाम भोगावे लागत आहेत. जोपर्यंत अभिनय आणि संगीत हातांत हात घालून गुण्यागोविंदानं नांदत होतीं, तोंपर्यंत ही चूक उमगलीच नाहीं. पण अभिनय व संगीत यांमध्यें सारखं नैपुण्य असलेले नट, जेव्हां नाहींसे झाले, तेव्हां ही चूक समजून आली. बापूराव पेंढारकर वारले नि बालगंधर्व म्हातारे झाले. त्यामुळें अभिनयावरचा ताबा उडाला नि संगीताचा गोंधळ सुरू झाला. अभिनय ही कसरत होती. अभिनय नैपुण्याकरतां अखंड मेहनतीची आवश्यकता होती. अभ्यासाची जरूरी होती. आणि नेमकं याच गुणांचं वावडं लोकांना होतं. त्यांनीं संगीताचा आदरस्तपणाही उडवून लावला. नि शिल्लक ठेवलं, गज्जल, कवाली नि लावणी.

मराठी रंगभूमीची ही आजची परिस्थिती होती. ऐन उमेदींतल्या मराठी रंगभूमीचं तेज नि सौंदर्य मी बाबांच्याबरोबर पाहिलेलं होतं. तीच राजविलासी रंगभूमी लक्तरांत वावरतांना पाहून मला दुःख होत होतं. तें दैन्य मला पहावत

नव्हतं. ज्या भावबंधनानं बुडणारी बलवंत नाटक मंडळी वांचली, नव्हे उत्कर्षाचा सोपान चढूं लागली, तेंच गडकऱ्यांचं तेजस्वी नाटक, असल्या ओंगळ स्वरूपांत पाहण्याचं दुर्भाग्य आज आमच्या नशिबी यावं, या परतं दुर्दैव कोणतं !

आधुनिक तंत्राची नवी मराठी नाटकही मी पाहिली तो सुटसुटीतपणा मला आवडला. नाटकंही मला आवडली. फार गाजलेलं "कुलवधू" मी मुद्दाम पाहिलं. आवडलं मला तें. पण पाहिल्यावर नाटक पाहिल्याचं समाधान कांहीं मला झालं नाहीं. कसलीतरी रुखरुख लागली होती. कांहींतरी न्यून यांत आहे, अशी माझी समजूत झाली. काय कमी आहे, हें मात्र मला समजलं नाहीं, विलायती फुलासारखी ती नाटकं नेत्रदीपक होती. पण मनाला संतोष देणारा मधूर सुवास त्यांना नव्हता. कृत्रिम नि नकली. " आग्ऱ्याहून सुटकामधले " दाते, ' सवती मत्सरांतले ' पोतनीस, खडाष्टकमधलें औंधकर, संशयकल्लोळांतले सावकार, भावबंधनातले कोल्हटकर, स्वयंवरातले बालगंधर्व, माझ्या डोळ्यासमोरून सरकूं लागले. त्यांच्या अभिनयाची दीप्ती या आधुनिक नाटकांत मला दिसली नाहीं. त्यांच्या अभिनयाची सहजता नि भावनेच्या छटा न् छटा उकलून दाखविण्याची अभिनयाची सूक्ष्मता, याचा आढळ आजच्या रंगभूमीवर होत नव्हता.

ही परिस्थिती बदलण्याकरतां होतकरू पण मेहनती नटनटींना, मेहनत घेऊन तयार करावयास पाहिजे होतं. अभिनय ही एक कला आहे. आणि ती कष्टसाध्य आहे, ही गोष्ट त्यांना पटवून द्यावयास पाहिजे होती. खरं म्हटलं तर ही गोष्ट आमच्या जुन्या नटवर्गांनीं अगावर घ्यावयास हवी होती. नव्हे, ती त्यांचीच जबाबदारी होती. केशवराव भोंसले गेले, पण बापूराव पेंढारकरांनीं त्यांची जागा भरून काढली. पण बापूराव गेले नि ललितकलेचा चिवडा झाला. गंधर्व म्हातारे झाले, नि कंपनीला टाळं लागलं. आपली परंपरा पुढें चालू राहिली पाहिजे, अशी काळजी त्यांनीं घेतली नाहीं. दाते, कोल्हटकरही याच मालिकेंतले. आत्मबिंदूभोंवती ते घोटाळत राहिले, नि त्याचमुळें तेजस्वी नटांची महाराष्ट्रीय परंपरा खंडित झाली.

' सारस्वतासारखं ' तेजस्वी नाटक, नादान नटामुळें, साफ पडलं, येव्हढं युगप्रवर्तक नाटक, कां कोसळावं, याचा विचार रंगभूमीच्या अभिमान्यांनीं करावयास

इवा होता. तेजस्वी नाटककारांची परंपरा अखंडित होती. पण त्या ताकदीचे नट मात्र सांपडत नव्हते.

बबनरावाला हाताशीं धरून नवी नाटकं रंगभूमीवर आणावी, असं मला फार फार वाटत होतं. म्हणूनच मी यांच्याबरोबर सहकार्य करावयाचें ठरविलं होतं.

पण प्रत्यक्ष अनुभव मात्र वेगळाच येत होता.

बबनराव हा नुसता बडबड्या होता. त्याला कांहींच समजत नव्हतं. अभिनय म्हणजे काय याची त्याला कल्पनाही नव्हती. सिनेमाथाटाचं संगीत हेंच नाटक यशस्वी होण्याचं मुख्य सूत्र आहे अशी त्यांची कल्पना होती. त्याचमुळें त्याचे नि माझे खटके उडत. मी फक्त गाण्याला साथ करायची, इतर गोष्टीकडे लक्ष द्यायचं नाहीं, असं त्यानं मला सागून टाकलं.

सुमित्रामध्यें पडली नसती, तर मी त्याचवेळीं बबनरावाला रामराम ठोकून चालता झालों असतों. पण केवळ सुमित्रेमुळें मी बबनरावच्या खोलीवर जाणं येणं ठेवलं होतं.

*    *    *

सुमित्रा बुद्धिमान् होती. पण ती ज्या माणसाच्या सहवासांत होती, त्या माणसात तिच्या बुद्धिमत्तेचा प्रभाव पडणं शक्य नव्हतं. बबनराव आणि त्याचे सहकारी निर्बुद्ध होते. म्हणूनच सुमित्रेनं त्यांची संगत सोडून द्यावी असं मला वाटे. या वाटण्यांत थोडीशी उपकारबुद्धि नि थोडासा स्वार्थही होता. हे अडथळे दूर झाले असते, तर सुमित्रेचा अखंड सहवास मला मिळाला असता.

पण बबनरावाला दुःखविण्याची सुमित्रेची तयारी नव्हती. तिचा संसार बबनरावाच्या मदतीमुळेंच चालत होता. महिना दोनशें अडिचशेंची कमाई तो तिला मिळवून देत असे. त्याच कमाईवर ती आपल्या दोन लहान भावांचं शिक्षण, नि म्हाताऱ्या आईचा संभाळ करीत असे.

माझं सारं म्हणणं पटत असूनही, सुमित्रा माझ्या म्हणण्याप्रमाणें म्हणूनच वागूं शकत नव्हती. बबनरावाची प्रभावळ ती ओळखून होती. पण त्यांना तोडून टाकणं, म्हणजे स्वतःचा संसार हातानें उधळून टाकणं, असंच झालं असतं. आपल्याच हातानें, पायावर कुऱ्हाड मारून घेणं तिला शक्य नव्हतं. बबनरावांची

प्रभावळ, तिच्या नि माझ्या दृष्टानं जरी शंकास्पद होती; तरी खुद्द बबनराव मात्र तसा नव्हता. बबनरावबद्दलचं माझं प्रतिकुल बनलेल मत, जरी बदललं नाहीं, तरी बबनराव शुद्ध चारित्र्याचा होता, ही गोष्ट नि.संशय. सुमित्राही तशी कणखर होती.

रंगभूमी हे सुमित्रेच्या दृष्टीनं, पैसे मिळविण्याचं एक साधन होतं तिचा आवाज चांगला होता बाधा डौलदार होता. चेहरा आकर्षक होता. मराठी चार पाच यत्तेपर्यंत ती शिकलेली होती. अर्थात् पैसे मिळविण्याचा अन्य मार्ग तिला सापडणं अशक्यच होतं. थोडं फार इंग्रजी शिक्षण पदरात पडलं असतं, तर ती आज एकाद्या रेशनिंग–ऑफिसमध्यें सहज शिरली असती पण शिक्षण आड आलं, नि म्हणूनच तिला हा मार्ग स्वीकारावा लागला.

बबनराव नि सुमित्रा एकाच माळेचे मणी होते. कला या दृष्टीनें ते रंग-भूमीकडे पहात नव्हते. थोडीशी हमाली करायची नि पैसे मिळवायचे हेंच त्याचं ध्येय होतं. त्यांना नाव कमविण्याची ईर्षा नव्हती. पोटाची खळगी भरण्याकरता फक्त पैसा हवा होता कारकूनी उत्साहानेंच ते कामं करीत होते

म्हणून माझ्या कल्पना कल्पनेंतच राहिल्या. रंगभूमीची सुधारणा व्हावी, ही कल्पना त्यांना शिवलेलीच नव्हती. बबनरावाच्या कच्छपी लागण्यांत अर्थ नाहीं, ही गोष्ट मला समजून चुकली.

पण सुमित्रेला ही गोष्ट आवडली नाहीं. मला सुमित्रा आवडत होती. सुमित्रा मला प्रिय होती पण सुमित्रेचा संसार बबनरावाच्या मदतीवर अवलंबून होता. म्हणून तिला बबनराव जवळचा वाटे. मलाही तो तितकाचा जवळचा वाटला पाहिजे, असा तिचा आग्रह होता, पण माझी त्याला तयारी नव्हती.

सुमित्रेला मी थोडी फार आर्थिक मदत करीत होतो पण तिचा सारा संसार पोसण्याची माझी तयारी नव्हती, नव्हे मला ते शक्यही नव्हतं. आजच्या या महागाईच्या काळांत, असलं लोढणं गळ्यांत बांधून घेणं मूर्खपणाचं ठरलं असतं. नुसती सुमित्रा मला हवी होती. पण सुमित्रा एकटी माझ्या वाट्याला येणं अशक्य होतं. त्याचमुळें सुमित्रेला माझ्यापेक्षां बबनराव जास्त जवळचा वाटे.

ती माझा द्वेष करीत नव्हती. उलट ती बबनरावापेक्षा, माझ्यावरच जास्त प्रेम करीत होती. पण हें संसाराचं लोढणं तिच्या गळयात होतं. त्यामुळें तिला विचार करण भाग होतं.

× × × ×

खाणावळींतल्या कदान्नाला मी कंटाळून गेलों होतो. वृंदा गेल्यापासून मीं जवळ जवळ विरक्तच झालों होतों. माझं कशांतही लक्ष नव्हतं खायचं म्हणून मी खात असें. खाणावळींत जें पानावर पडेल तें, खाववलं तर खायचं, नाहींतर तसंच येऊन झोपायचं, हा माझा क्रम होता त्याचा परिणाम माझ्या प्रकृतीवर होत होता. पण मी त्याची कधींच पर्वा केली नाहीं.

पण सुमित्रेनं मला पुन्हा माणसात आणून बसवलं. खाणावळींत कदान्न मिळतं, याची जाणीव उत्पन्न झाली. पण त्याला दुसरा इलाज नव्हता लग्न केल्या शिवाय नशिबांतली खाणावळ सुटणं शक्य नव्हतं.

माझं लग्न ही अशक्य गोष्ट नव्हती. यापूर्वी माझ्या नातलगांनीं माझा पिच्छा पुरवून मला नकोसं केलंच होत. पण त्यांना मी आतांपर्यंत नकार देत होतो. त्याना नुसतं कळवलं असत तर चोविस तासांच्या आत त्यानीं मला चतुर्भूज केलं असतं. पण मला तेच नको होतं. कोणत्या तरी एका अनोळखी तरुणीला पत्नी म्हणून वागवायची माझी तयारी नव्हती. अनोळखी तरुणीचा सहवास ही नुसती कल्पनादेखील मला किळसवाणी वाटे. म्हणूनच माझ्या नातलगाची सूचना मी आतांपर्यंत धुडकावित आलो.

सुमित्रेबरोबर संसार थाटण्याची माझी तयारी होती. किंबहुना करायचं तर सुमित्रेबरोबरच लग्न करायचं, असं मी ठरवूनसुद्धां टाकलं होतं. सुमित्रा मला नाकारणार नाहीं, याची मला खात्री होती. पण सुमित्रेची परिस्थिती मी जाणून होतो त्याचमुळें तिला तसं विचारण्याचं धैर्य मला होत नव्हतं. आणि त्या विचारण्यांत अर्थही नव्हता. आपले भाऊ मार्गाला लागल्याशिवाय लग्नाचा विचार करण्याची तिची तयारी नव्हती.

अर्थात् तिनं असं स्पष्टपणें मला सांगितलं नव्हतं. तिनं तसं सुचविलं मात्र होतं. म्हणूनच स्पष्टपणें मी तिला लग्नाबाबत छेडलं नाहीं. मला नकार ऐकण्याची

इच्छा नव्हती. निराशेला मी विटून गेलों होतों. गप्प रहायचं असंच मी ठरवून टाकलं होतं.

पण तिच्या सहवासाची आत्यंतिक ओढ मला लागलेली होती. नोकरी सोडून छायेसारखं तिच्या मागें मागें रहावं असं मला वाटे. पण नोकरी सोडल्यावर आज मला ती जी किंमत देते, ती कदाचित् मला मिळणार नाहीं, अशी साधार भीति मला वाटे. निष्कांचन मनुष्याची किंमत आजच्या जगांत शून्य आहे, ही गोष्ट मला समजलेली होती. वृंदेनें एक चांगला धडा दिला होता. त्याच इतिहासाची पुनरावृत्ती करण्यांत फायदा नव्हता

बबनरावाबद्दल मला जी सूक्ष्म असूया वाटे तिच्या पोटींच ही भावना निर्माण झाली होती, हें निश्चित. माझ्यापेक्षां बबनरावाना रिकामा वेळ जास्त मिळे. आणि म्हणूनच सुमित्रेच्या माग पिंगा घालीत भटकण्याला त्याला कधींच अडचण पडत नव्हती. त्या दोघांच कार्यक्षेत्रही एकच होतं, आणि ही गोष्ट बबनरावाच्या पथ्यावर पडली.

दिलरुबा शिकण्याकरतां सुमित्रा माझ्याकडे येत असे. सुमित्रा अगदीं न चुकतां येत असे. पण दिलरुब्याकडे तिचं लक्षच नव्हतं. दिलरुबा ही एक सबब होती. शिकण्याऐवजीं, गप्पागोष्टी करण्यातच ती वेळ दवडित असे. तिचं दिल-रुब्याकडे लक्ष नव्हतं, ही गोष्ट मला कळून चुकलेली होती. पण मींही तिकडे फारसं लक्ष पुरवलं नाहीं. तिच्या सहवासाची माझी भूक या कारणामुळें विनायास भागली जात असे.

दररोज सकाळीं ती माझ्याकडे येई. तास दीडतास गप्पा गोष्टीं वा गायन वादनांत जात. नऊ वाजतां मी खाणावळींत जात असे, नि ती आपल्या घरचा मार्ग धरीत असे.

बबनरावापक्षां, माझ्याकडे ती जास्त आस्थापूर्वक लक्ष देत असे. निदान मला तरी असं वाटे. कदाचित् माझा तो दृष्टिदोष असेल. तसं म्हटलं तर बबन-रावाच्या मदतीमुळेंच तिचा संसार आज उभा होता. बबनरावाचे हे उपकार होते. सुमित्रा, बबनरावांशीं वागतांना याच भावनेनं वागत असे. तिच्या वागण्यांत बोलण्यांत बबनरावांबद्दलची कृतज्ञता नेहमींच आढळून येई. बबनरावांशी बोल-

तांना ती मोठ्या लीनतेनें बोले. आदबशीर वागे. पण माझ्याशीं वागतांना ती जी आपुलकी दाखवित असे, ती आपुलकी, ते ममत्त्व, बबनरावाशीं वागतांना आढळत नसे. बरोबरीच्या मित्राशीं ज्या भावनेनं आपण वागतो, तिचाच आढळ माझ्याशीं वागतांना मला होई.

या आपुलकीचा प्रत्यय त्या दिवशीं मला आला. एका नवीन निघणाऱ्या नाटक कंपनीकडून सुमित्रेला बोलावणं आलं होतं. सुमित्रेनं कोणत्या नाटकांत भूमिका करावी, नि कोणत्या करूं नये, हें बबनरावच ठरवित असे. तशी तो तिच्यावर सक्ती करीत नसे. पण सुमित्रा बबनरावांच्याविरुद्ध सहसा जात नसे. नवीन स्थापन होणारी ही कंपनी चांगली होती असं माझं मत होतं. कांहीं सुशिक्षित, पण हौशी तरुणांनीं या कंपनीची स्थापना केली होती. एकदोन जुन्या नटवर्यांचं त्यांना सहाय्य मिळणार होतं. म्हणूनच सुमित्रेनं त्या नाटकांत काम करावं असं माझं मत होतं.

पण बबनरावाचा या गोष्टीला विरोध होता. सुमित्रेनं त्यांच्या नाटकांत काम करूं नये, असं त्याचं मत होतं. " या सुशिक्षित माणसांचा भरंवसा देतां येणार नाहीं. ही काय आज एकत्र जमतील. पण उद्यां त्याच्यातच फाटाफूट होईल नि आपल्या नशिबीं मात्र फुकटची हमाली. प्राप्ती एक पैचीदेखील होणार नाहीं. " असं बबनरावांनीं तिला सांगून टाकलं.

पैशापेक्षां या जाणक माणसांच्या सहवासांत जो अनुभव मिळेल, तो लाख मोलाचा आहे असं मला वाटत होतं. आणि अशी जाणक माणसं त्या कंपनींत होती. मी हें सुमित्रेला नीट समजावून सांगितलं.

बबनरावांचा सल्ला धुडकावून सुमित्रेनं त्या कपनींत काम करायच ठरवलं.

त्या दिवसापासून बबनराव मला टाळूं लागला. माझ्याबद्दल त्याला असूया वाटूं लागली. तो नकळत माझा द्वेष करूं लागला.

द्वेषाचा हा अग्नि धुमसतच राहिला. बबनरावाचा पाणउतारा करण्याचा सुमित्रेचा हेतू नव्हता. त्याचा उपमर्द करण्याची कल्पना, तिला स्वप्नांतदेखील सुचली नसती. माझं म्हणणं पटलं म्हणूनच ती त्या कंपनीत जाण्यास तयार झाली. तिचा फायदा होईल अशी माझी कल्पना होती, म्हणून मी तसा आग्रह धरला

होता. बबनरावाचा तेजोभंग करण्याची माझीही इच्छा नव्हती: पण सुमित्रा माझ्या कच्छपीं लागली आहे, आपण तिला नकोसे वाटतो, असा बबनरावाचा विनाकारणच ग्रह झाला होता. आपल्या या संशयाचं निराकरण करण्याचा त्यानें प्रयत्नच केला नाहीं. तो आंतल्या आत कुढत राहिला.

या आगीत आणखी एका गोष्टीची भर पडली. खाणावळींतल्या अन्नाचा माझ्या प्रकृतीवर फारच परिणाम होऊं लागल्यामुळें, वैतागून मी कच्च्या अन्नाचा प्रयोग सुरूं केला होता. पण सुमित्रेला माझे हे हाल पाहवत नव्हते. म्हणून मी तिच्याच आग्रहामुळें, तिच्याकडे जेवणास सुरवात केली. नाहीं तरी खाणावळील मी पैसे भरतच होतो. येवढ्याच पैशात, सुमित्रा मला घरगुती जेवण देत होती. पण ही गोष्ट बबनरावाला आवडली नाहीं. मी कायमचाच तिच्या घरीं राहीन अशी त्याला भीति वाटत असावी.

पण बबनराव स्वस्थ बसणारा मनुष्य नव्हता. सुमित्रेला शह देण्याकरतां त्यानें नवी नटी हुडकून काढण्याचा उद्योग सुरूं केला. सुमित्रेकडून मला या साऱ्या हकीगती कळत होत्या.

आणि एक दिवशीं, दु:खजड आवाजात सुमित्रेन मला सांगितलं, " सुबोध, उद्यांपासून तुमची जेवणाची व्यवस्था तुम्हींच करा. "

मला धक्काच बसला—

असं कांहीं होईल, अशी मला कल्पना नव्हती. हा धक्का मला अनपेक्षित होता. बबनराव दुखावला गेला होता, ही गोष्ट खरी होती. पण सुमित्रा इतक्या सहज रितीन त्याच्या बाजूला वळेल, याची मला कल्पना नव्हती. धूसपूस चालूं होती. पण मला वाटल कीं जेव्हा प्रत्यक्ष नाटकाच्या तालमी सुरूं होतील, त्या वेळीं सुमित्रेला नि बबनरावालादेखील माझ्या म्हणण्याचा प्रत्यय येईल नि हा धुमसणारा अग्नि शांत होईल. पण होत होतं उलटंच.

सुमित्रा नि बबनराव यांच्या मैत्रीत बिब्बा घालण्याचा माझा हेतू नव्हता. तसं माझ्या मनांतदेखील नव्हतं. सुमित्रा मला हवी होती. ती मला पाहिजे होती. पण तसा प्रयत्न मी मुद्दामहून केला नव्हता. मात्र तिच्याबद्दलची आसक्ती मी छपवूं शकलों नाहीं. हाच माझा दोष होता पण मी एकटा दोषी नव्हतो.

सुमित्राही त्या दोषाची वांटेकरीण होती. तिन मला उत्तेजन दिलं, म्हणून माझी आसक्ती बळावत गेली. तिच्या प्रत्येक शब्दांत, प्रत्येक कृतीत माझ्याबद्दलची आपुलकी ओसंडून जात असे. तो आपुलकीचा झरा असा एकाकी का आटून जावा ? प्रगट झालेली आपुलकीची गंगा एकदम गुप्त झाली. कां व्हावं असं ?

म्हणूनच मी सुमित्रेला विचारलें, " सुमा, काय झालं ? "

" काहीं झालं नाहीं. पण आईला स्वयंपाक होत नाहीं, नि मला स्वयंपाका-कडे लक्ष देण्याइतका वेळही मिळत नाही. " काहीं तरी उडवाउडवीचं उत्तर देऊन वेळ निभावून नेण्याचा केविलवाणा प्रयत्न तिनं केला.

पण असल्या उडवाउडवींनं मी फसणारा नव्हतों आईचं नांव ही नुसती सबब होती. मी तिच्याकडे जेवावं असा आग्रह नव्हे सक्ती तिनेंच केली होती या गोष्टीला पुरता महिनासुद्धा झाला नव्हता.

म्हणूनच जरा रागांतच मी तिला म्हटलें, " हें पूर्वीच समजायला हवं होतं तुला. मी तुझ्यावर सक्ती करत नव्हतो. "

" मला कल्पना नव्हती मला वाटलं की येवढ्या माणसांत एकादं माणूस सहज निभावून जाईल. पण..."

" जाऊंदे सुमा, तुझ्या इच्छेच्या आड येण्याची माझी इच्छा नाहीं तूं अमुक कर असं सांगण्याचा मला अधिकारही नाहीं. पण विनाकारण आईचं नांव ईरेस टाकून तूं खरी गोष्ट छपविण्याचा प्रयत्न कां करतेस, हें मला समजत नाहीं. जाऊं दे झालं. पण ही बंदी फक्त जेवण्यापुरतीच आहे, कीं घरीं येण्याची पण बंदी आहे. "

" तें तुमच्यावर अवलबून आहे, तुम्हांला वाटलं तर तुम्हीं येऊं शकतां. याच अशी सक्ती कशी करतां येईल ? "

" पण माझ्या येण्यानं तुझ्या घरचं स्वास्थ्य बिघडणार नाहीं ना ? "

" तेंही तुमच्या वागण्यावर अवलंबून आहे. "

सुमित्रेच्या या उत्तरानं मी एकदम भडकून गेलों. स्वतःवरचा ताबा उडाला. मी तिचा हात धरून, तिला खोलीबाहेर ढकलीत म्हणालों, " चल निघ. पुन्हां तुझं तोंडही दाखवू नकोस मला. "

" होय सुबोध, तेंच आतां माझ्या नशिबीं आहे. "

तिच्या आवाजांतली कातरता मला जाणवली. मी वळून तिच्या चेहऱ्याकडे पाहिलें. दोन्ही नेत्रांतून अश्रूंची झरणी सुरू झाली होती. तिचे अश्रू मला पाहवत नव्हते. कांहीं झालं तरी ती माझी होती. सुमित्रा मला प्रिय होती. तिला छातीशीं कवटाळीत मी म्हटलें, " सुमा, काय झालं ? "

" सागण्यासारखं कांहींच नाहीं. तुमची माझ्याशीं होणारी सलगी बबन रावाला पसंत नाहीं. जें त्यांना पसंत नाहीं, तें करण्याचं धैर्य माझ्यांत नाहीं. "

' पण बबनरावाला येव्हढं भिण्याचं कारण काय ? "

" आज त्याच्याच मेहेरबानीवर आम्हीं जगतोय, त्यांनींच आम्हांला हे दिवस दाखविले. त्यांचे उपकार स्मरणं, हें माझं कर्तव्य आहे त्यांचा आधार गेला तर आम्हीं उपाशीं मरूं. "

" सुमा, मी हमी घेतो तुझ्या साऱ्या माणसाची. तूंही तुझं काम सोडून दे. आपण लग्न करून सुखी होऊं चल. माझा विश्वास नसेल, तर तुझ्या आईच्या नांवानं बॅंकेत पैसे ठेवतो. बोल, सुमा, तूं मला हवी आहेस. "

" मलाही तुम्हीं हवेसे वाटतां. पण आज तरी तें शक्य नाहीं तुमची विनंती मला मान्य करतां येत नाहीं. आई या गोष्टीला संमती देत नाहीं. आणि बबनरावांना तर असं होणं पटणारच नाहीं. तेव्हां उगाच डोकंफोड करण्यांत अर्थ नाहीं. "

" चल मी येतो तुझ्याबरोबर. तुझ्या आईची मी समजूत घालतों."

" ते शक्य असतं तर या थराला गोष्टी आल्याच नसत्या सुबोध. आई कांहीं ऐकायला तयार नाहीं, कुणाचंच तिला पटणार नाहीं. तिचा सारा विश्वास बबनरावांवर आहे "

' बबनराव इतका नीच आहे ? "

" नीच नाहीं. स्वार्थी आहे. बरं आहे सुबोध, नमस्ते. "

तोंडांत पदराचा बोळा कोंबित, सुमित्रा झपाट्यानं चालूं लागली.

तारवठलेल्या डोळ्यांनीं मी नुसता पहातच राहिलों.

× × × ×

वृंदा गेली. सुमित्राही आली नि गेली. सूर्यप्रकाश सहन होईना, म्हणून मी मागे सरलों. सुदैवानें शीतल चंद्रप्रकाश मला लाभला. पण किती क्षणभंगूर. तो

चंद्रप्रकाशही आतां लोपला आहे. आतां राहिलाय फक्त अंधार. गडद अंधार. अमावस्येचा काळाशार अंधःकार. माझं जीवन, या काजळी अंधःकारानं भरून गेलं आहे.

सुमित्रा ! सुमित्रा गेली. दुःखद आठवणींचं आणखी एक जड ओझं माझ्या शिरावर ठेवून ती निघून गेली. माझ्या आळसावलेल्या जीवनांत तिनं चैतन्य उत्पन्न केल होतं वठलेल्या वृक्षाला पालवी फुटूं लागली होती. निष्क्रीयतेचं लेणं फेंकून, मी हालचालीला सुरवात केली होती. नि अशाच वेळी ती मला सोडून गेली गारठलेल्या गात्राना उब येत होती. पण एकदम उष्णता नाहींशी झाली, नि सारीं गात्रं पुन्हां बधिर होऊं लागली.

खोली सोडून बाहेर येण्याची मला इच्छाच होत नव्हती. खाणं सुचत नव्हतं. मला पिणं सुचत नव्हतं कशांतही मन रंगत नव्हतं. दिलरुब्याला हात लावासा देखील वाटत नसे. एकांत हाच माझा सोबती झाला होता, माझ्या व्यथा कुणाला सागण्यासारख्या नव्हत्या जगात मला स्नेही सोबती नव्हते. मी एकटा होतो. सुमित्रा गेली नि या एकटेपणाची तीव्रतेनं मला जाणीव झाली. माझ्या सुखानं हरखून जाणारं या जगांत कोणी नव्हतं माझ्या दुःखानं कोमेजून जाणारंही कोणी नव्हतं मी एकटा होतो भयाण एकांत हाच माझा सोबती होता जीवघेणा एकांत माझा सहचर होता. या जाणीवेनेच मी जास्त दुःखी झालों. एकटेपणाचं हें शल्य, क्लेशदायक होत.

जगण्याची ओढ मला नव्हती; पण मरण्याची कल्पनाही सुखद वाटत नव्हती. मी कां जगत होतो हा प्रश्न मात्र अनुत्तरीत राही. ना स्नेही ना सोबती ना सहचरी. निष्प्रेम नि एकाकी जीवन. असं जीवन मी कां जगावं ? मनुष्य जगतो कशासाठीं ? तरुणीचं प्रेम हेंच एकमेव कर्तव्य गाजविण्यासाठीं खास नाहीं. मग सुमित्रेच्या नकारानं मी येव्हढं जायबंदी होऊन कसं चालेल ? मानवी जीवनाला दुसरा कांहींतरी अर्थ असलाच पाहिजे. प्रेम हा जीवनाचा स्थायीभाव असेलही. पण तें प्रेम म्हणजे, मी सुमित्रेवर करीत होतो ते प्रेम नक्कीच नव्हे. जीवमात्र सुखासाठीं धडपडतो हें खरंच. पण तरुणीचा सहवास, हेंच सुखाचं एकमेव साधन नाहीं.

सुमित्रेचा सहवास, ही कल्पना मला नक्कीच सुखद वाटत होती. पण सुमित्रा दुर्मिळ झाली, म्हणून इतर सुखावर लाथ मारणं वेडेपणाचं होतं. मी तोच वेडेपणा

करीत होतों. एकांताच्या बंदीगृहांत स्वत:ला कोंडून घेऊन, मी इतर गोष्टींना मज्जाव केला होता. पण मी एक घोडचूक करतोय ही गोष्ट मला कळून चुकली.

वृंदेची आठवण सुमित्रेनं बुजवून टाकली आतां सुमित्रेची आठवण बुजवून टाकावयास हवी होती. पण त्यासाठीं आणखी एकादी दमयंती शोधण्याची माझी तयारी नव्हती. दोन चटके मला बसले होते. आतां तिसऱ्यांदा हात पोळून घेण्याची माझी इच्छा नव्हती.

दिलरुब्याकडे मी पुन्हां लक्ष देण्यास सुरवात केली. पण आतां नाटक वाजविण्याची माझी तयारी नव्हती. रेडियोवरदेखील मी कार्यक्रम घेत नसे. मी वाजवित असे फक्त स्वत:च्या समाधानासाठीं

मला किर्तीची हौस नव्हती, पैशाची ओढ नव्हती. वेळ घालविण्यासाठींच मी दिरुलबा छेडित असे.

दिलरुब्याच्या जोडीला मी आतां वाचन सुरूं केलं होतं. पटत असूनही मी मित्र जोडण्याची खटपट केली नाहीं. लोकांत मिसळणं मला आवडतच नव्हतं.

तरीदेखील माझी बेचैनी वाढतच होती मुंबईत राहणं मला रुचेनासं झालं. मुबई सोडून कुठंतरी दूर जावं असं वारंवार मनांत येई. पण जायचं कुठं, हाच प्रश्न होता. दोन चार जे नातेवाईक होते, ते मुंबईत राहात असत. तेव्हां त्यांच्याकडे जाण्याचा प्रश्नच नव्हता. मुंबईपासुन दूर एखाद्या खेड्यांत जाऊन पडावसं वाटत होतं. खेड्यांना तोटा नव्हता. पण कुठचं खेडं निवडायचं हाच प्रश्न होता. एकादं निसर्गसुंदर खेडं मला हवं होतं. मुंबईच्या यांत्रिक जीवना-पासून अलिप्त असलेलं खेडं मला पाहिजे होतं. कपड्याची नि घड्याळाची गुलाम नसणारी माणसं मला हवी होती. त्यांच्या सहवासांत, स्वच्छंदपणं जगावं, ही फॅशन, नि कपडा यांची गुलामगिरी झुगारून द्यावी, नि निर्वेधपणं पडावं अशी तळमळ मला लागली होती.

मुंबईचा तिटकारा मला स्वस्थ बसून देत नव्हता. नागरी जीवनाचा मला आतां उबग आला होता. आम्हीं यंत्राचे गुलाम होत चाललों होतों. निसर्गाची गुलामगिरी फेंकून देण्याच्या नादांत, नकळत आम्हीं यंत्राच्या आहारी गेलों. भूक लागेल तेव्हां जेवायचं ही सवय आम्हीं मोडून काढली, नि घड्याळ सांगेल

त्यावेळीं जवायचं आम्ही सुरू केलं. ही गुलामगिरी मला नकोशी वाटत होती. कपड्याची गुलामगिरी. अंगांतून घामाच्या धारा निथळत असल्या, तरी कपड्याचं ओझं अंगाखांद्यावर वागविण्याचा सक्ती. ही गुलामगिरी, हे दास्यत्व !

मुंबई सोडायचा मी निश्चयच केला होता. नोकरीचं त्यागपत्र मी देऊन टाकलं. माझ्या एकाकी संसारांतली इतर अडगळही विकून टाकली. आतां शिल्लक ठेवलं होतं, फक्त एक कपड्याची पेटी नि माझा दिलरुबा. या दोन्ही वस्तू खाकोटीला मारून मुंबईला रामराम ठोकायचा विचार मी केला होता. कुठं जायचं हा प्रश्न अजूनही सुटलेला नव्हता. पण कुठं जायचं, याचा आतां विचारच करायचा नाहीं, असं मी ठरवून टाकलं होतं. पाय नेतील ती दिशा, नि थांबू ते गांव.

त्या दिवसापासून सुमित्रा पुन्हां माझ्याकडे फिरकली नाहीं. ती येईल अशी मला आशाही नव्हती. किंबहुना तिनं आतां येऊ नये, असंच मला वाटत होतं. मी जो निश्चय केला होता, तो निश्चय पुरा पाडण्याचं धैर्य, तिच्या सहवासांत मला झालं नसतं. म्हणूनच तिनं येऊं नये, असं मी इच्छित होतो. पण हें सारं वरकरणी होतं. मनांतून माझी इच्छा नव्हती. ती यावी असं मला वाटत होतं. माझं ओढाळ मन, तिच्याकडे धांव घेत होतं. तिच्याबद्दलची आसक्ती अजूनही कमी झालेली नव्हती. म्हणून ती यावी अस मला वाटे. तिनं यावं, नि या बांधाबांधीचा, या विरक्ततेचा जाब मला विचारावा असं मला वाटत होतं.

सुमित्रा येऊं शकणार नाहीं, हें मी जाणून होतों. आईला नि बबनरावाला दुःखविण्याचं धैर्य तिच्या अंगीं नव्हतं. पण हें माहीत असूनही, सुमित्रा येईल. या आशेवर, मी अजूनही मुंबईतच रेंगाळत होतो. पण जसजसे दिवस जात होतें, तसतशी तिची येण्याची आशा, अंधूक होत होती. माझं ओढाळ मनही आतां पूर्णपणें विटून गेल होतं. निराश झालं होतं.

म्हणूनच भायखळ्याला मिळालेल्या एका मोटारबसमध्यें बसून मी मुंबई सोडली.

ती मोटार कुठं जाणार होती हें मला माहीत नव्हतं. मी विचारपूसही केली नाहीं. तिकिटाबद्दल पैसे मागितले ते दिले. तिकिट कुठच्या गांवचं होतं हेंही पाहिलं नाहीं मी. तिकिट खिशांत कोंबून मी गाडींत बसलों.

ऑगस्ट महिना संपत आला होता. पण ऑक्टोबरचा उन्हाळा आतां-पासूनच जाणवूं लागला होता. प्रखर ऊन पडलेलं होतं, पावसाचं चिन्हही नव्हतं. मोटार, उतारूंनीं भरून गेली होती. किती उतारू जादा कोंबले होते ते क्लीनरच जाणे. पण मोटारींत मी नुसता उबून गेलो होतो. मुंबई सोडण्याचा निर्णय फारच घाईनं ठरवला असं मला वाटूं लागलं. पण मोटारबाहेर पडणं सुलभ नव्हतं. ट्रूंका नि वळकट्यांची तटबंदी ओलांडून दरवाजा गाठणं अश-क्यच होतं.

क्लीनरनें हँडल फिरवलं. मोटारींत चैतन्य आलं, नि मोटार सुरूं झाली. मुंबईतले चिरपरिचित रस्ते नि दृश्यं भरभरां मागं पडूं लागली. राणीचा बाग, लालबागच्या ट्रॅम स्टँडजवळचं घड्याळ, परळ, खोदादाद सर्कल भरभर मागें पडत होती.

मागें पडणारी मुंबई, मी अधाशीपणानं डोळ्यांत साठवित होतो. पुन्हां ही मुंबई मला दिसेल, न दिसेल ही. माझी चिरपरिचित मुंबई आजपासून मला मुकली आहे. कांहीं वेळांपूर्वी जी मुंबई मला नकोशी वाटत होती, जिथं राहणं मला कंटाळवाणं झालं होतं, तीच मुंबई मला आता हवीशी वाटूं लागली. मुंबईचा वियोग मला सहन होत नव्हता. ती पळणारी दृश्यं, माझ्या मनांत कालवाकालव करीत होती. मी अगतिकपणें डोळे मिटले.

पण मोटारनें मध्येंच एक जोराचा धक्का दिला नि माझी तंद्री भंग पावली. मी नीट सांवरुन बसलों. दिलरुब्याची पेटी व्यवस्थितपणें ठेवली.

मोटार वेगानें पळत होती. आंतले उतारू दाटीदाटींनं चेंगरून गेले होते. त्यांतलें कांहीं गप्पा मारीत होते. कांहीं धूम्रपानांत मग्न होते कोंपऱ्यांत बसलेला एक शेतकरी, झालेल्या सौद्याचा हिशोब, बोटें मोडीत करीत होता. त्याच्या जवळच एक तरुण जोडपं गुलगुल गोष्टी करण्यांत मग्न झालं होतं. तरुणीच्या हातांतले हिरवे चुडे, त्यांचं लग्न आतांच कांहीं दिवसापूर्वी झालं असल्याची साक्ष देत होते. त्या जोडप्याच्या बाजूस एक लठ्ठ मारवाडी पेंगत बसला होता.

माझ्या समोरच्या बांकावर, एक तरुण मारवाडीण बसली होती. तिचा चेहरा मला दिसत नव्हता. तोंडावर पदर ठेऊनच ती बाहेर पहात होती. पण

तिच्या त्या झिरझिरीत ओढणींतून तिच्या आकर्षक चेहऱ्याची अस्पष्ट कल्पना येत होती. चेहरा झांकण्याकडेच तिचं लक्ष असल्यामुळें, उघड्या पडलेल्या छातीकडे तिचं दुर्लक्ष झालं होतं लाल हिरव्या तुकड्यांची कांचोळी तिनं अंगांत घातलेली होती. त्या घट्ट कांचोळींतूनही तिच्या पुष्ट उरोजांचा डौलदार बांधा स्पष्टपणें उठून दिसत होता. गाडीच्या धक्क्यामुळें त्या उरोजाची होणारी सूक्ष्म हालचाल, गिर्रेबाज कबुतराच्या डौलदार पदन्यासाची आठवण करून देत होती.

तिला पाहतांच, मी मागें पाहिलेल्या एका नृत्याची मला तीव्रतेनं आठवण झाली. ती नर्तिकादेखील अशाच पेहरावांत स्टेजवर आली होती. ती मारवाडीण जितकी सुडौल होती, तितकाच तिच्या शेजारी पेंगत पडलेला मारवाडी बेडौल होता तिच्या शेजारीच तो बसला होता त्यामुळें हा विरोध चटकन डोळयात भरत असे.

त्या मारवाडणीच्या शेजारीं एक किंचित् स्थूल बांध्याची गुजराथीण वसली होती. गाडीतल्या खेंचाखेचीकडे तिचं लक्षच नव्हतं. प्रशस्तपणें मांडी ठोकून ती बसली होती. तिच्या मांडीवर एक अर्भक होतं तें मूल रडत होतं, नि ती गुजराथीण जवळच्या पुडींतली भजी खात होती. त्या मुलाचं रडणं मला ऐकवत नव्हतं पण तिला तें रडणं जणूं ऐकूंच येत नव्हतं; इतक्या निर्विकारपणें ती खाण्यात मग्न होती. त्या मुलाचं रडण किती वेळ चालूं राहिलं असतं ईश्वर जाणे पण आपल्याला एक लहान मूल आहे, नि आता तें भुकेमुळें केंकाटत आहे, याची जाणीव तिला झाली. खाण्यावरचं लक्ष न काढताच, तिनं डाव्या हातानें पोलक्याची बटनं काढली, नि त्या रडणाऱ्या मुलाच्या तोंडांत स्तन दिला.

गाडी वेगांत पळत होती झाडं, टेकड्या भराभर मागं पडत होती. मघाशी चालू असलेली कुजबूज नि गप्पागोष्टी आतां थंडावल्या होत्या. हिशेब करणारा शेतकरी आतां पेंगत होता. तें नवविवाहित दांपत्य आता स्वस्थ बसून होतं. तरुण मारवाडीण अजूनही बाहेरच पहात होती. गुजराथीणीच्या मांडीवरील मूल स्वस्थ झोंपलं होतं. ती स्वतःदेखील पेंगत होती. स्तनपानाकरतां बाहेर काढलेला स्तन अजूनही अनावृत्तच होता. तिला त्याचं भानही नव्हतं तिच्याप्रमाणें ते स्तनही बेडौल होते. चरबीच्या पिशव्याच. त्या मारवाडणीचा डौलदारपणा त्यांत नव्हता.

सूर्य आतां कलला होता. निरभ्र आकाश आतां ढगाळून गेलं होतं. मधून मधून वाऱ्याची झुळूक येई; नि त्यामुळें शिणलेल्या गात्रांना जरा तजेला येई. पण आतां वाऱ्यानं वेग घेतला होता. रस्त्यांतली धूळ गुलालासारखी उधळीत तो चालला होता. त्यामुळें सारं वातावरण धूसर झालं होतं. पाऊस लवकर येणार हे निश्चित होतं. म्हणूनच ड्रायव्हर गाडी जोरानं पिटाळीत होता जणूं काय येणाऱ्या वादळाबरोबर त्यानें शर्यत लावली होती. दोघांची स्पर्धा चालली होती. कोण कुणाला हरवतोय, याचाच सामना सुरूं होता. अटीतटीचा सामना. गाडी भर वेगांत चालली होती. वाऱ्याचा वेगही वाढता होता उडणाऱ्या धूळीमुळें बाहेरचं कांहीही दिसत नव्हत. मोटार धूळीनं भरली होती. अंगावर, कपड्यांवर धूळच धूळ झाली होती.

गाडींतलें उतारू शांत होते. कोणीही कुजबूजत नव्हतं कोणीही बोलत नव्हतं सारेजणं जागेच होते पेंगणारं कोणीच नव्हतं. प्रत्येकजण स्वस्थ बसून काय होतंय ते पहात होता. गाडींत भयाण शांतता होती.

मोटार वेगानं पळत होती. धुरळ्यामुळें बाहेरचं कांहींच दिसत नव्हतं. ड्रायव्हरलादेखील रस्ता दिसत होता, कीं नव्हता कोण जाणे. वाऱ्याचा जोरही वाढतच होता. पण अजून पावसाला सुरवात झाली नव्हती. मधूनच विजा चमकत. त्या प्रकाशानं सारा प्रदेश क्षणमात्र उजाळून जाई. नि पुन्हां ते धूसर कुंद वातावरण. विजेच्या प्रकाशांत, तें धूसर वातावरण, भीषण वाटे.

मेघांचा गडगडाट चालूं होता, वीज एकदम चमकली; नि कानठळ्या बसविणारा आवाज ऐकूं आला. कुठं तरी वीज पडली असावी; नि एकदम ब्रेकचा चर्र आवाज ऐकूं आला. मोटार किंचित् कलल्याचा भास झाला. काय होत होतं हें समजत नव्हतं. मोटारला आचके बसत होते. नि एकदम एक जबरदस्त धक्का बसला. काय होतेय हे समजण्यापूर्वी सारे उतारू एकमेकांवर कोलमडून पडले.

मुलाच्या रडण्यानें मी भानावर आलों. माझं डोकं बधिर झालं होतं. मी कुठं आहे याचाच अर्थबोध मला होत नव्हता. कसल्या तरी जड ओझ्यामुळें मला श्वास घेणंही अशक्य वाटत होतं.

मी डोळे उघडून पाहिले, माझ्या अंगावर तो मारवाडी पडला होता.

त्याच्या जवळच ती मारवाडीण पडलेली होती. पायावर त्या गुजराथी स्त्रीचा दे
अस्ताव्यस्त पडलेला होता; आणि एका वळकटीवर पडलेलं तिचं अर्भक टाहे
फोडित होतं.

कसे बसे आम्हीं बाहेर पडलों मुका मार सर्वांनाच बसलेला होता. पण
तशी जखम कुणाला झाली नव्हती. ड्रायव्हरलाही थोडासा मार बसला होता.

मोटारच्या इंजिनचा चुराडा झाला होता. एका झाडाला मोटारनं टक्क
दिली होती.

आता काय करायचं हाच प्रश्न होता. निर्मनुष्य प्रदेशांत आम्हीं अडकून
पडलों होतो. मदतीची आशा नव्हती. वादळाचा जोर वाढतच होता. सारी रात्र
अशा वादळांत कशी घालवायची या प्रश्नाचं उत्तर सांपडत नव्हतं.

मदतीची एकच आशा होती. एखादी येणारी जाणारी मोटार. त्याच
आशेवर सारे ताटकळून बसले होते.

पूर्वेच्या बाजूला एक उंच डोंगर होता. आकाश काळ्या मेघांनीं भरून गेल
होतं, त्या काळ्या पार्श्वभूमीवर, डोंगराची ती काळी आकृति एखाद्या राक्षसासारख
दिसत होती मधून चमकणारी वीज त्या भीषणतेंत भर टाकीत होती.

अपघाताच्या जागेपासून शंभर कदमाच्या अंतरावर एक नदी वहात होती
नदीच्या काठावर झाडाझुडूपाची गर्दी झाली होती.

सूर्य आता मावळला होता. अंधाराचं राज्य सुरूं झालं होतं. त्यां
ढगाळलेलं आकाश, त्या अंधाराच्या मदतीला आलं होतं. हवेंत कुंदपणा आल
होता. मोकळेपणानं श्वास घेणदेखील जड वाटत होतं.

त्या नदीच्या कांठाला एखादं खेडेगांव असावं, असा माझा तर्क होता. इथ
ताटकळत बसायची माझी तयारी नव्हती. कुठं जायचं हें देखील ठरलेलं नव्हतं
समजा एखादी मोटार मिळाली नि आमचा प्रवास सुरूं झाला, तरी मी कु
जाणार हें मला अज्ञातच होतं. मोटार प्रवासाचा शेवट एखाद्या शहरांत होईल
येव्हढंच. पण मला नागर जीवनाचा हव्यास नव्हता. तें जीवन मी पुरेपु
अनुभवलं होतं. त्या जीवनापेक्षां वेगळं असं जीवन मला हवं होतं.

म्हणूनच मोटारची वाट न पाहतां मी माझी पेटी नि दिलरुबा घेऊन
नदीच्या दिशेनं चालण्यास सुरवात केली.

नदीचं पात्र बरंच मोठं होतं. पात्र दुथडी वाहात होतं; नि प्रवाहाला बराच जोर होता. काळोखामुळं पाणी काळंभोर दिसत होतं. नदीच्या खोलीचा अंदाज मला येत नव्हता. म्हणून ती नदी ओलांडून जाण्याचं धैर्य मला होत नव्हत. कुठं जावं याचा विचार करीत मी उभा राहिलों. पण त्या डोंगराचं आकर्षण मला पूर्वेकडं खेचित होतं. त्या डोंगराच्या पायथ्याशीं एकादं चिमुकलं खेडं असेल; नि त्या चिमुकल्या खेड्यांत या डोंगराच्या सहवासांत, साऱ्या चिंता, मनस्ताप, अपमानाच्या जखमा आपण विसरूं असं मला वाटत होतं. प्रत्यक्ष तिथं खेडं होतं कीं नाहीं, हें मला माहीत नव्हतं. अशी माहीती देणारं कोणी भेटेल अशी आशा करणही व्यर्थ होतं. डोंगराच्या दिशेनं मी चालावयास सुरवात केली.

पण तें चालणं सुलभ नव्हतं. मुंबईच्या डांबरी रस्त्यावर मी मैल दोन मैल सहज चालत असे. पण ते चालणं, नि हें चिखल तुडवित दगड धोंड्यांना ठेंचाळत चालणं, यांत जमीन अस्मानाचा फरक होता. त्यांत काळ्याशार अंधाराची भर. रस्ता अनोळखी किंबहुना रस्ता नव्हताच. जाऊं तो रस्ता नि करूं ती वाट अशी परिस्थिती होती. अंधारामुळं काहीं दिसत नव्हतं विजेच्या प्रकाशांत थोडा वेळ जें कांहीं दिसेल, त्यावर अंदाज बाधित मी चाललों होतों.

या असल्या प्रवासाची मला संवय नव्हती. ठेंचाळून माझी बोटं रक्तबंबाळ झाली होती. माझं फॅशनेबल चप्पल केव्हाच चिखलांत जाऊन पडलं होतं पायांत गोळे येत होते माझ्या. सकाळपासून मी कांहींच खाल्लं नव्हतं. त्यामुळें एकदम अशक्तता वाटूं लागली. एक एक पाऊल जडपणं टाकीत मी चालत होतो.

त्यांत आतां पावसानें सुरवात केली. झाडांझुडुपांचा एक पट्टा ओलांडून थोडाश्या उघड्या जागेंत मी पाऊल टाकतों न टाकतों तोंच पावसाची एक जोरदार सर आली. झाडाचा आश्रय घेण्यापूर्वीच मी पार भिजून गेलों.

पावसाचा जोर कमी होईपर्यंत झाडाखालीं बसणं मला भाग होतं. मुंबईपासून दूर, एका निर्मनुष्य जंगलांत मी भूतासारखा त्या झाडाखालीं बसलों होतों. अज्ञात नि एकाकी. निसर्गदेखील कोपला होता माझ्यावर. नागरी–जीवनानं विटाळलेली माझी काया, शुद्ध करून घेण्याचा खटाटोपच जणूं निसर्गानं सुरूं केला होता. आणि या अग्निदिव्यांतून जाण्यावांचून दुसरा मार्ग आतां मला राहिलेला नव्हता.

परत फिरणंही शक्य नव्हतं. मोटार मधले माझे सहकारी कदाचित् गेलेही असतील. मोटारच्या प्रेताजवळ पडण्यापेक्षां इथं पडलेलं काय वाईट ?

आणि आतांपर्यंतच्या आयुष्यांत जें मी केलं नाहीं तें मी इथं या झाडाखालीं, कोसळणाऱ्या पावसांत, अंधाऱ्या रात्रीं करीत होतों. हो, मी विचार करीत होतों. माझ्या गत आयुष्यांतले प्रसंग माझ्या नजरे समोरून भरभर जात होते. माझं बाळपण, वृंन्देचा परिचय, भास्कररावांची शिकवणी, बाबांचा मृत्यु, वृंदेचा वियोग नि सुमित्रा. सारे प्रसंग आठवले मला. विफल जीवनाची ती एक शोककारी कहाणी होती.

या कहाणींत दिलचस्प असं कांहींच नव्हतं. उदात्त ध्येयाचा साक्षात्कारही, नव्हता. एका सामान्य तरुणाची, मामुली कहाणी होती ती. ध्येयशून्य नि गतिशून्य कहाणी. या कहाणींत बोध नव्हता, रंजकताही नव्हती. दुबळेपणा नि गतानुगतिकता याच्या साऱ्यांत तयार झालेली ही कहाणी होती.

काय करावं हें मला समजतच नव्हतं. आणि समजण्याला मार्गही नव्हता. काय करायचं हेंच मी अजून ठरवलं नव्हतं. कोणत्या गावाला जायचं तें गांव अजून निश्चित झालं नव्हतं. पण मी मात्र वेड्यासारखा रस्त्याचा विचार करीत होतों. गाव निश्चित केल्याशिवाय मार्ग सांपडणं अशक्य असतं. आयुष्यांत काय करायचं हें ठरविल्याशिवाय ही निष्क्रीयता जाणं शक्य नव्हतं.

पण ध्येय ध्येय म्हणजे काय याचा बोध मला होत नव्हता. कांहींतरी अशक्य, कांहीं तरी अप्राप्त नजरेसमोर ठेऊन घाण्याच्या बैलासारखं ठराविक रगणात फिरणं यालाच ध्येयप्रधान जीवन म्हणायचं असेल, तर या जीवनापेक्षां माझं हें आतांचं निष्क्रीय, उदासीन पण अनिर्बंध जीवन जास्त चांगलं होतं. उर फुटेपर्यंत मृगजळाच्या माग धांवण्यापेक्षां, कशाचीही अपेक्षा न धरतां स्वैर भटकणं मला जास्त श्रेयस्कर वाटत होते. या जिण्यांत निदान अपेक्षाभंगाची तरी धास्ती नव्हती. अपेक्षाच बाळगायची नाहीं, मग अपेक्षाभंग कसला होणार ?

पाऊस अजून थांबला नव्हता. पण पावसाचा जोर बराच मंदावला होता. ठेंचाळत, धडपडत मीं पुढचा प्रवास सुरू केला.

नदीच्या कांठाकांठानेंच मी जात होतो. नदीच्या कांठावर वसलेलं 'एकादंतरी

गांव आपल्याला लागेल अशी माझी कल्पना होती. माझी कल्पना अगदीं कल्पना नव्हती. पाऊण तासाच्या ठेंचाळलेल्या प्रवासानंतर, लुकलुकणाऱ्या एका दिव्याचं दर्शन मला झालं. "जमीन जमीन" म्हणून आनंदातिशयान ओरडणाऱ्या कोलंबसाच्या खलाश्यांची मला आठवण झाली.

पण तो दिवा नदीच्या दुसऱ्या कांठावर दिसत होता. म्हणजे नदी ओलांडणं भागच होतं. अंधारामुळें काहींच दिसत नव्हतं. पाण्याच्या खोलीचा अंदाज घेणंही त्यामुळें कठीण होत मला पोहताही येत नव्हत. त्यामुळें नदी ओलांडून पलीकडे कसं जावं हा एक प्रश्नच होता

मी अगदी थकून गेलों होतो. ठेंचाळलेली पायाची बोटं आता चागलीच ठणकू लागली होती पायांत गोळे आले होते. अंगात हुडहुडी भरत होती. कपाळाच्या शिरा ताडताड् उडत होत्या, नि डोळ्यात आग पेटली होती. एकेक पाऊल टाकणं कष्टप्रद झालं होतं चालताना झोंक जात होता नीट उभं राहणंही मला जमत नव्हतं.

पावसाची रिपरिप चालूच होती. पाऊस थांबण्याचं लक्षण दिसत नव्हतं. मात्र मघाचं वादळ आता मंदावलं होतं वाऱ्याचा जोर कमी झाला होता. विद्युल्लतेच नर्तन बंद झालं होतं. पण अंधार वाढतच होता त्या काजळी अंधारात, अनोळखी मार्गानं, झोंकाड्या खात मी एकेक पाऊल टाकीत पुढें चाललों होतो.

कोणीतरी जात असल्याचा भास मला झाला. मी एकाग्रतेन ऐकूं लागलों. खास कोणीतरी जात होतं मी मोठ्यानं साद घातली. पण त्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं झप्झप् पाऊलं टाकीत मी पुढं गेलों.

मला जी चाहूल लागली ती माणसाची नव्हती. एका गाईची होती माझ्या समोरून ती आडवी निघून गेली माझ्या डोक्यांत लख्खकन् प्रकाश पडला. गाय गेली ती धांवतच. पाण्यांत पडल्याचा आवाज काहीं ऐकूं आला नाहीं उलट तिच्या खुरांचा अस्पष्ट आवाज मात्र ऐकूं येत होता. तेव्हा एकादा पूल असलाच पाहिजे.

माझा कयास बरोबर होता. विस पंचविस कदमांवर तो पूल होता पूल पाहतांच माझ्या शिणलेल्या गात्रांना, उत्साह आला. त्या उसन्या उत्साहांतच मी पूल ओलांडून नदीपार झालों.

समोरच्या झाडींतून त्या मिणमिणत्या दिव्याचे प्रकाश किरण येत होते. त्या दिशेने मी वाट चालायला सुरवात केली.

माझीं पावलं कष्टानं पडत होती. सारं अंग गारठून गेलं होतं. गात्रं बधिर झाली होतीं. डोळ्याची जळजळ वाढत होती घसा कोरडा पडला होता. एकादा गरम गरम चहाचा पेला मिळाला तर मला हवा होता. गरम चहाची मला तीव्रतेनें आठवण झाली. पण त्या निर्जन रानात चहा मिळण्याची शक्यता दिसत नव्हती.

पोटांतले कावळे ओरडून ओरडून दमले होते. गोळाभर अन्नही मिळण्याचा संभव नव्हता. माझ्या पेटींत पैसे होते. पण त्या पैशाचा कवडीइतकाही उपयोग मला होत नव्हता. पैशांनीं पोट भरतं मुंबईत. पैशाची उब मिळते मुंबईत. पण या निर्जन जंगलांत त्या पैशाचा काडीइतकाही उपयोग नव्हता

ज्या ठिकाणाकडे मी जात होतो तें काय होतं याची मला कल्पना नव्हती. ती एकाद्या शेतकऱ्याची झोंपडी असावी असं मला वाटत होतं. एकादा भाकरीचा तुकडा जरी मिळाला असता तरी माझं पोट भरलं असतं.

पण ती शेतकऱ्याची झोंपडी नव्हती तें एक जुनं देऊळ होतं. देऊळ लहानच होतं. पण देवळात कोणीही नव्हतं. तें देऊळ मारुतीचं होतं. मारुतीच्या समोर एक पणती तेवत होती. मला दिसलेला दिवा म्हणजे ही पणती होती. देवळाच्या भिंती स्थानभ्रष्ट झालेल्या होत्या. पण वरचं छप्पर मात्र अजूनहीं शाबूत होतं.

माझी निराशा झाली. कोरड्या जागेशिवाय इथं काहीं नव्हत. कांहीं खाण्याला मिळण्याची आशाच नव्हती.

मनुष्यवस्ती इथून फार लाब नव्हती हे निश्चित. तें देऊळ पडकं होत; पण उपेक्षित मात्र नव्हतं. कोणी तरी दररोज या देवळात येत असलं पाहिजे हे निश्चित. ती पेटणारी पणती, मूर्तीजवळची सारवासारव, कोंपऱ्यांत व्यवस्थित रचून ठेवलेली निर्माल्याची रास, नि मूर्तीवर वाहिलेली फुलं, या देवळात कुणी तरी भक्त नित्य नियमानें येत असावा हें दर्शवित होती.

असल्या या वादळी रात्रीं या देवळांत कोणीही येणं शक्य नाहीं हें मला

समजत होतं. पण सकाळीं कुणी तरी इथं येईल नि जवळपासच्या गांवाची चौकशी आपल्याला करतां येईल; अशी आशा मला वाटू लागली.

बसल्या जागेवरून हलणं आतां मला शक्य नव्हतं. मी अगदीं गलितगात्र झालो होतों. अंगांत त्राण राहिलं नव्हतं. डोळे आग ओकित होते. पायाच्या वेदना असह्य होत होत्या. अंगांत ताप होता. डोळे उघडून बाहेर पाहणं मला अवघड वाटत होतं.

पाऊस अजूनही पडतच होता. पावसाचे तुषार मधून मधून अंगावर पडत नि सारं अंग एकदम शहारून जाई. तें देऊळ, ती मारुतीची मूर्ती, ती पेटणारी पणती, आजूबाजूच आसमंत माझ्या भोंवतीं गरगर फिरत आहे, असा भास मला होत होता. मी डोळे उघडण्याचा प्रयत्न केला. पण डोळे उघडणं मला अशक्यच वाटे. कोणी तरी कसल तरी जड जड वजन माझ्या पापण्यांवर ठेवलं आहे नि त्यामुळें डोळे उघडणं मला अशक्य झालंय असं मला वाटत होतं तें जड वजन पापण्यावरून फेंकून देण्याकरतां मी हात वर केला. पण कुणी तरी मला पायानीं खाली खेंचित आहे. एका खोल गर्तेत माझं शरीर खोल खोल जात आहे कुणाची तरी घट्ट मिठी माझ्या कमरेला पडलेली आहे. नि त्या जबरदस्त मगर-मिठींतून सुटण्याकरतां माझ्या जीवाची आटाआट चालू आहे. कित्येक अनोळखी चेहरे माझ्याकडे पहात, तिरस्कारानं हंसत होते होय त्यात कांहीं ओळखीचे चेहरेही होते हो. ती वृंदाच होती. हसत खिदळत ती चालली होती. तिची ती झोंकदार साडी, प्रकाशांत चमकणारीं तिचीं ती उंची कर्णभूषणं. पण वृंदा गेली. ही तर सुमित्रा. होय बबनरावही छायेसारखा आहेच तिच्या मागं. सुमित्रादेखील माझ्याकडे पाहून हंसते. सुमित्रा तूं अरे पण ही दाढीधारी मूर्ती कुणाची कोण बर! अरे, हे तर भास्करराव. भास्करराव मला हंसणार नाहींत. मी तुमच्या पायावर डोकं ठेवितो. भास्करराव मला क्षमा करा. हं काय सारा अंधार! अंधार! भीषण अंधार! कुठं आहे मी? कुठ आहे मी ......

—भाग १ ला समाप्त—

भाग २ रा

# तपोवन

सूर्य नुकताच वर आला होता. स्नान आटोपून चिंतोबा कांठाजवळच्या कातळावर अंग कोरडं करीत उभे होते. ओलेल्यानीं त्यानीं सूर्याला नमस्कार केला. नदीला फूल अक्षता वाहिल्या, नि मारुतीच्या देवळाकडे ते वळले.

त्यांचा हा नित्य क्रम होता. ऊन असो, पाऊन असो, वा कडाक्याची थंडी असो, चिंतूअण्णांच्या या नित्यक्रमांत कधींच खंड पडत नसे. नदीच्या पाण्याची सूर्योदयापूर्वी आंघोळ नि आंघोळ झाल्यावर ओलेत्यानेंच मारुतीचं दर्शन या यांच्या नित्यक्रमांत कधींच खंड पडलेला नव्हता. ते मारुतीचे उपासक होते. शनिवारी ते उपवास करीत. रुईच्या पानाची माळ मारुतीला घालीत.

तें देऊळ गांवकीचं होतं. पण त्या देवळाची सारी व्यवस्था चिंतूअण्णाच पहात असत. आपखुषीनें त्यांनीं ही जबाबदारी घेतलेली होती. त्या देवळाच्या दुरुस्तीला लागणार खर्च त्यांनीं केला होता. दररोज पेटणाऱ्या पणतीकरतां लागणारा तेल तेच पुरवित. हनुमान जयंतीच्या उत्सवाचा खर्च तेच सोशिंत असत.

त्या मारुतीवर त्याची अपार श्रद्धा होती. देऊळ गांवाच्या बाहेर, जरा एकाकीच होतं. पण ती जागा फारच रमणीय नि शांत होती. देवळाजवळूनच नदीचा प्रवाह जात होता. देवळाच्या पायऱ्यांवर उभं राहिलं कीं नदीचं तें संपूर्ण पात्र, पलिकडील तीरावरची गर्द झाडी नि त्यामागे उभा असलेला तो डोंगर यांचं निसर्गसुंदर दृश्य चटकन् डोळ्यांत भरे. देवळाच्या आजूबाजूला आंबा, वड इत्यादि वृक्षांची गर्दी होती. उन्हाळ्याच्या दिवसात या गर्द छायेंत विश्रांती घेणं हा चिंतूअण्णाचा आवडता छंद होता.

नेहमींप्रमाणें पायऱ्याना वंदन करीत ते देवळांत शिरले. शिरतानाच त्याना एकदम आठवण झाली दोन दिवसापूर्वी इथंच, या देवळात मूर्तीजवळ अस्ताव्यस्त पडलेला एक तरुण आपल्याला दिसला होता. तो शुद्धीवर नव्हता. त्यावेळीं गड्याच्या मदतीनें त्यांनीं त्याला घरीं नेला, आणि लगबगीनं शास्त्रीबुवाना बोलावणं पाठवलं.

तो तरुण कोण, कुठचा, इथं कसा आला, याचा पत्ता त्यांना अजूनही लागलेला नव्हता. गेले दोन दिवस तो गुंगींतच होता तो अजून शुद्धीवर आला नव्हता. गुंगींतच तो कांहींतरी बडबडे. पण त्याचा अर्थबोध चिंतूअण्णाना होत नव्हता. शास्त्रीबुवा जीं औषध सांगित तीं ते आपुलकीनं देत पण त्या औषधांचा प्रभाव अजून पडलेला नव्हता. रसरसलेल्या निखाऱ्यासारखं तापलेलं त्याचं शरीर अजूनही तितकंच तप्त होतं.

देवळाच्या पायऱ्या चढतांना चिंतूअण्णांना त्या तरुणाची आठवण झाली. आज तरी तो शुद्धीवर यावा, त्याचा ताप उतरावा अशी प्रार्थना हात जोडून ते करींत होते. पण त्याचीं प्रार्थना मारुतीनं अजूनही ऐकलेली नव्हती. तो रामभक्त रामाच्या एकाद्या कामगिरीवर गेला होता कीं काय न कळे.

नेहमींप्रमाणें पूजाअर्चा करून अण्णानीं आपलं गाऱ्हाणं पुन्हां एकवार मारुतीरायाला ऐकवलं. भक्तीभावानं, मारुतीपुढें नाक घासून ते घरीं परतले.

गोठ्यांतून बाहेर पडणाऱ्या गणूला हांक मारीत ते म्हणाले, "गणू, शास्त्रीबुवा आलेत ?"

"आतांच आलं नव्हं कां." गणूनें गुरांना वळवित उत्तर दिले.

अण्णा लगबगीनें पुढें गेले. ओटीवरच त्या तरुणाचा बिछाना घातलेला होता. त्याच्याजवळ बसून शास्त्रीबुवा नाडी पहात होते.

ओटीच्या पायऱ्या चढतांनाच त्यांनीं आपल्या मुलीला हांक मारली "द्वारका."

ओटीच्या दरवाजांत द्वारका हात पुशीत उभी राहिली. अण्णासारखीच ती किंचित् ठेंगू होती. तिच्या भरदार शरीरयष्टीमुळें, तिचा ठेंगूपणा चटकन् डोळ्यात भरत असे. अण्णांपेक्षां ती बरीच उजळ होती तिचा चेहरा आकर्षक होता. डोळे एकाद्या तुडुंब भरलेल्या जलाशयासारखे शात होते. पाहाणाराला त्यामुळें एकदम तिच्याबद्दल आदर वाटूं लागे

अण्णाच्या हातातला धोतराचा पिळा व परडी घेऊन ती न बोलता आत गेली.

" काय शास्त्रीबुवा, काय म्हणतोय रोगी ?" अण्णा शास्त्रीबुवाजवळ बैठक मारीत म्हणाले

"चागलीच सुधारणा आहे अण्णा. ज्वर आता बराच कमी झालाय. शुद्धी-देखील आली आहे. पण अशक्तता फार आहे " त्या तरुणाचा हात काळजीपूर्वक बिछान्यावर ठेवित शास्त्रीबुवा हळूंच कुजबुजले

"हं" अण्णानीं एक सुटकेचा श्वास टाकला.

"बरं का शास्त्रीबुवा" अण्णा शास्त्रीबुवाना माजघरात नेत म्हणाले, "फार काळजी वाटत होती मला. हो काय होतंय नि काय नाही समजा, जर भलतंच झालं असतं, तर नसतं किटाळ यायचं अंगावर. धर्म करतांना कर्म यायचं कपाळीं "

"हो पण आता तशी धास्ती नाहीं अण्णा का हो अण्णा, हा पाहुणा कोण ?" शास्त्रीबुवानीं पृच्छा केली.

"खरं सागूं शास्त्रीबुवा, हा तरुण कोण आहे, हें मलादेखील माहीत नाहीं. आतां परवां तें वादळ नाहीं कां झालं ?"

"हो हो. परवा संध्याकाळचं वादळ."

"त्या वादळांत कुठं तरी वाट चुकली असावी याची. नेहमींप्रमाणें मी सकाळींच मारुतीच्या दर्शनाला गेलों. पाहतों तो मूर्तीच्या समोर हा तरुण अस्ता-व्यस्त पडलेला एकदम चरकलोंच मी. हो, जीवबिव दिलाय कीं काय म्हणून! हात लावून पाहिला. आंग नुसतं रसरसलेलं. तसाच धांवत आलों. गणूला मदतीला घेतला, नि त्याला घरीं आणला. झालं."

" पण तो कोण आहे हें तुम्हीं नाहीं विचारलंत त्याला ? "

"शास्त्रीबुवा, तो अजून शुद्धीवरच नाहीं. तेव्हां कसं विचारायचं त्याला. त्याला जरा बरं वाटूं द्या. काढूं सगळी माहिती त्याच्याकडून. हें पहा, शास्त्रीबुवा, औषधांच्या पैशाची काळजी करूं नका "

" छेः छे. तशी काळजी मी कशाला करूं. तुम्हीं आहांतच. " शास्त्रीबुवा उठत म्हणाले.

"होय. मी आहेच." अण्णा त्यांना दारापर्यंत पोंचवित म्हणाले. शास्त्रीबुवा गेले, नि अण्णा घरांत परतले.

"पाणी" खोल गेलेल्या आवाजांत त्या तरुणानें पाण्याची याचना केली. अण्णा एकदम त्याच्याजवळ गेले. त्याची दाढी वाढलेली होती. डोळे अगदीं खोल गेले होते. बुब्बुळांचा काळेपणा पार लोपून गेला होता. निस्तेज डोळे, सुरकतलेले पांढरे फिकट ओंठ, नि वाढलेल्या दाढीचे राकट खुंट यानीं त्याचा चेहरा भकास दिसत होता.

" थांबा हं थोडं दूधच घ्या आता म्हणजे बरं वाटेल. सकाळच्या रामप्रहरीं नुसतचं पाणी पिणं चांगल नाहीं, द्वारका, एक पेलाभर गरम दूध आण लवकर " अण्णा त्या तरुणाच्या उशाजवळ बसत म्हणाले.

" मी कुठं आहे ? " भांबावलेल्या त्या तरुणानें प्रश्न केला.

" इथं माझ्या घरीं. "

" इथं, तुमच्या घरीं ! इथं मी कसा आलों. ? "

" तें सारं मग सांगेन तुम्हाला. जरा हें दूध घ्या; नि स्वस्थ पडा थोडा वेळ. मग सावकाश आपण बोलूं हं. " त्याची समजूत घालीत अण्णानीं त्याला चमच्यानें दूध पाजावयास सुरवात केली.

दूध पोटांत गेल्यावर त्याला बरीच हुशारी वाटूं लागली. डोळ्यांत पाणी खेळूं लागलं. आवाज थोडा भरीव झाला.

" देवळांतून मी इथं कसा आलों ? " त्या तरुणानें अण्णांना विचारलें.

" गड्याच्या मदतीनं मीच तुम्हांला उचलून आणलं. तुम्हीं देवळांत बेशुद्ध होऊन पडलां होतात. "

" होय चक्कर आल्यासारखं मला झालं, नि म्हणून मी खालीं पडलों पण नंतर काय झालं तें मला समजलंच नाहीं. किती दिवस झाले या गोष्टीला ? "

" फार नाहीं दोनच दिवस. "

" दोन दिवस ! दोन दिवस मी शुद्धीवर नव्हतों तर ? "

" होय. नि त्याचमुळें माझा जीव टांगून गेला होता. काय होतंय नि काय नाहीं. नसतंच किटाळ अंगावर यायच मी याच कर्माला भीत होतो. पण मारुतीरायानं अब्रूचं संरक्षण केलं माझ्या. " भक्तीभावानें मारुतीला नमस्कार करीत अण्णा गद्‌गदून म्हणाले.

" माझ्यामुळें तुम्हांला फार त्रास सोसावा लागला—"

" अं हं, असं मुळीच मनात आणूं नका. तुमचंच घर आहे असं समजून वागा. संकोच बाळगूं नका. "

" खरोखर, तुमचा थोरपणा कौतुकास्पद आहे. पण माझ्या उपकारकर्त्यांचं नावही मला अजून माहित नाहीं "

" तुम्हीं असं भलतं सलतं मनांत आणूं नका. माझं नांव आहे चिंतामण. पण मला सारे अण्णाच म्हणतात. नि ही माझी मुलगी. द्वारका, हा पेला आत घेऊन जा. "

" नमस्कार, द्वारकाताई अण्णा, माझी सारी हकिगत मी आतांच नाहीं सांगत तुम्हांला. मी कोण, कुठचा नि इथं कसा आलों, ते जाणण्याची तुम्हाला जिज्ञासा असेलच. पण हळूंहळूं सांगेन तुम्हांला मी माझं नांव आहे सुबोध. सुबोध हळदणकर. राहणारा मुंबईचा "

" अस. वाटलंच मला तसं, बरं, आतां तुम्हीं स्वस्थ पडा. एकदम असा त्रास घेणं चांगलं नाहीं. " सुबोधच्या अंगावरील पांघरूण नीट करीत अण्णा म्हणाले.

थोडा वेळ कां होईना पण बडबडण्याचा केलेला त्रास, सुबोधला जाणवल्यावांचून राहिला नाहीं म्हणूनच अण्णांनीं सांगतांच, तो पटकन् डोळे मिटून निपचित् पडला.

अण्णा हलक्या पावलांनीं आंत गेले.

× × × ×

लिंबगांव हें एक खेडं होतं. इतर खेड्याप्रमाणेंच या गांवची बहुसंख्य वस्ती शेतकऱ्यांची होती. चिंतुअण्णा तसे धंद्याने शेतकरीच होते. त्यांची स्वत.ची जमीन होती; अणि स्वतः ते ती कसत.

गांवाजवळून एक नदी जात होती. गांवकरी तिला ' महालक्ष्मीचा ओढा ' अस म्हणत. त्या नदीच्या दुसऱ्या तीरावर एका टेकडीवर महालक्ष्मीचं एक पुरातन देवालय होतं, विजयादशमीला तिथं मोठी जमा भरत असे. कुस्त्या नि तमाशे यांची झुम्मड उडत असे. ही जत्रा म्हणजे गांवकऱ्याचं एक विसाव्याचं स्थान होतं. जत्रा होण्यापूर्वी तीन महिने अगोदर जत्रेची चर्चा सुरू होई. जत्रा कशी भरेल, कुस्त्यात कोण अजिंक्य ठरेल, कोणाचे तमाशे येतील, इत्यादि गोष्टींवर हमरीतुमरीच्या चर्चा होत. नि जत्रा संपून गेली तरी ' जत्रा ' हा विषय जुना होत नसे.

महालक्ष्मीची जत्रा हा लिंबगावकराचा अगदीं जिव्हाळ्याचा प्रश्न होता. त्याच्या नीरस नि कंटाळवाण्या जीवनांतलं ते एक विरंगुळ्याचं स्थान होतं. गांवात येणाऱ्या नवागताला या जत्रेची रसभरीत वर्णन सांगण्याला त्याना अवर्णनीय उत्साह येई. प्रत्येकाच्या रसवंतीला त्यावेळीं पाझर फुटत असे.

जत्रेची पाल्हाळीक वर्णनं, अतिरंजित म्हणून दुर्लक्षिली, तरी महालक्ष्मीच देऊळ हें दुर्लक्षण्याजोगं नव्हत. तें स्थान इतकं रमणीय होतं, कीं क्षणभर आपले मनस्ताप, आपल्या चिंता, कटकटी यांचा विसर सहजच पडे.

टेकडीच्या माथ्यावरील तें स्थान फार रमणीय होतं. देवळाचं बांधकाम फार पुरातन होतं. पण अजूनही तें शाबूत होतें. देवळाच्या आजूबाजूला गर्द झाडी होती. देवळाला लागूनच एक मोठसं पटांगण होतं. याच जागेंत जत्रा भरत असे. देवळाच्या प्रवेशद्वाराजवळ एक पाण्याचं कुंड होतं. कुंडांतलं पाणी स्वच्छ नि थंडगार असे. त्या कुंडाबद्दल गांवकऱ्यांना फार अभिमान वाटत असे. त्या कुंडांतलं पाणी कधींच आटत नसे. टेकडीजवळून वाहणारी नदी आटून गेली, तरी कुंडांतलं पाणी कमी होत नसे.

त्या कुडांबद्दल एक आख्यायिका होती. रामजी पाटलाचं कुंड म्हणून तें ओळखलं जाई. हल्लींचे शिदू पाटील त्यांचेच वंशज. रामजी पाटील देवीचे एकनिष्ठ

भक्त होते. देवीची पूजा केल्याशिवाय ते पाणीसुद्धां घेत नसत. पण एक वर्षी अवर्षण पडलं. नदी आटून गेली होती. हिरवं पान दिसणं मुष्कीलीचं झाल होत. पाण्याच्या अभावी गुरंढोरं नि माणसंही तडफडत होती. रुद्र, महारुद्र एकादष्ण्या झाल्या वरुणाची पूजा केली, प्रार्थना केली. पण कशाचाच उपयोग होईना. लोक अगतिक झाले होते. रामजी पाटील, लोकांचे ते निर्जीव नि भकास चेहेरे पाहून गाहिंवरून जात. पण त्यांचाही इलाज नव्हता. पण एक दिवशीं निश्चय करून ते बाहेर पडले. शेत कापणीचा विळा कमरेला खोंचून त्यानीं देवीच्या देवळाचा रस्ता चालवयास सुरुवात केली. देवीची प्रार्थना करून त्यानीं आपलं गाऱ्हाणं देवीपुढें सांगितलं नि दोन दिवसांत जर पाणी मिळाल नाहीं तर आपलं शीर कापून देवीला वाहण्याची घोर प्रतिज्ञा त्यानीं केली. दोन दिवस ते देवीच्या पायाजवळ पडून होते. पण पावसाचा थेंबही त्या दोन दिवसांत पडला नाहीं रामजी पाटील निश्चयानें उभे राहिले. कमरेचा विळा त्यांनीं बाहेर काढला देवीची एकवार प्रार्थना करून त्यांनीं विळा मानेवर ठेवला. पण देवीनें आपल्या भक्ताचा जास्त अंत पाहिला नाहीं. "भक्ता धीर सोडूं नकोस," असं म्हणत देवीनें तो विळा दूर टाकून दिला. विळा जेथें पडला तिथं पाण्याची कारंजी उडूं लागली. त्याच जागेवर हें कुंड बांधलं गेलं.

लिंबगांवकर आजही ही आख्यायिका मोठ्या अभिमानानं सांगतात. देवीच्या पायाजवळ ठेवलेला रामजी पाटलाचा विळाही ते तेव्हढ्याच अभिमानानें दाखवितात.

× × × ×

पडल्या पडल्या सुबोध हा सारा इतिहास ऐकत होता. प्रत्येकजण आपापल्या मगदूराप्रमाणें कमी अधिक प्रमाणांत हीच हकीगत रंगवून सांगत असे. आणि त्याचमुळें महालक्ष्मीचं देऊळ नि ती टेकडी केव्हां पाहूं असं त्याला झालं होतं. पण तो अगतिक होता. अजून उठायची शक्तीदेखील त्याच्या अंगांत नव्हती. चिंतोपंत सर्व परीनं त्याची काळजी घेत होते. पथ्यपाणी नि औषधं चालूंच होती, होतं होतं तें सारं आपुलकीनं. त्यांत औपचारिकपणा नव्हता. यांत्रिकपणा नव्हता. परोपकार वा त्याग याची बोंचक जाणीवही त्यांत नव्हती. सुबोध हा चितूअण्णांच्या घरांतलाच एक आहे, अशी प्रत्येकाची भावना होती.

ही आपुलकी, हा जिव्हाळा सुबोधलाही जाणवत होता. ही माणसं आपल्या-साठीं येव्हढी कां झटतात, यांचं उत्तर त्याला सांपडत नव्हतं. या उपकाराची परत फेड आपल्याला कशी करतां येईल, याचीच विवंचना त्याला लागून राहिली होती.

शहरी जीवनाची त्याला कल्पना होती. त्या जीवनाची मूल्यं तो जाणीत होता. पण खेडवळ जीवनाशीं त्याची अजून तोंडओळखही झाली नव्हती. म्हणून तो असा गांगरून गेला होता.

पैसा हें जीवनाचं अधिष्ठान आहे असं त्याला वाटत होतं. असा अनुभव मुंबईत त्याला प्रत्यही येतही होता. त्याच अनुभवावरून त्यानें आपलं मत बनवलं होतं. पण तें मुंबई पुरतंच खरं होतं, ही गोष्ट त्याला अजून उमगली नव्हती.

× × × ×

दिवस पांखरासारखे उडून जात होते. अंथरुणवार नुसता पडून राहणारा सुबोध, आतां हिंडूं फिरूं लागला होता. शास्त्रीबुवाच्या औषधाचा परिणाम हळूंहळू होत होता. मुंबईत असता तर कदाचित् तो इतक्या वेळात सहज पूर्वस्थितीला आला असता. टॉनिक नि इंजक्सन्स या खेड्यांत दुर्मिळ होती. नि जरी मिळाली असती, तरी त्यांचा उपयोग होण्यासारखा नव्हता. पण शास्त्रीबुवांच्या पाळ्या-मुळ्यांनीं त्याला बरं केलं होतं चितुअण्णांचा शास्त्रीबुवांवर फार विश्वास होता. शास्त्रीबुवांचा हात धरणारा पंचक्रोशीत दुसरा वैद्य नव्हता. रोगनिदान करण्यांत ते पूर्ण तरबेज होते. अचूक नाडीपरीक्षा हा शास्त्रीबुवाच्या हातचा मळ होता. पण शास्त्रीबुवा जरा पैशाचे लोभी होते. लिंबगांवकरांना शास्त्रीबुवांचे गुणाव-गुण माहित होते. म्हणूनच मरणोन्मुख सुबोधला वांचविण्याकरतां, चितुअण्णांनीं आपल्या पिशवीच तोंड उघडंच ठेवलं होतं.

स्वतःच्या मुलासारखी त्यांनीं सुबोधची बडदास्त ठेविली होती. दुर्दैवानें त्यांना मुलगा नव्हता. एकुलती एक मुलगी होती. म्हणूनच पुत्राकरतां आसुसलेलं त्यांचं मन, सुबोधवर मायाममतेची पखरण घालीत होतं. आपल्याला मुलगा नाहीं. आतां होण्याचीही आशा नाहीं. पण आपल्या परम भक्ताचं हें न्यून, मारुती-रायाला पाहवलं नाहीं. म्हणूनच त्यानं कृपाळू होऊन, सुबोधला आपल्याकडे

पाठविला असा चिंतूअण्णांचा ग्रह झाला होता. मारुतीवरील अंधश्रद्धेमुळें म्हणा किंवा पुत्रवात्सल्याच्या अतृप्त लालसेमुळें म्हणा, सुबोधवरील त्यांची माया वृद्धिंगतच होत होती.

आपल्याला मुलगा नाहीं, ही गोष्ट त्यांच्या अगदीं जिव्हारी बसलेली होती. वरकरणी ते तसं दाखवित नसत. आणि तसं दाखवून तरी काय फायदा होता? उलट त्याचा वाईट परिणाम द्वारकेवर झाला असता. तिला दु:ख झालं असत. आईवेगळी ती पोर अकारण दुखविली गेली असती. म्हणूनच ते अगदीं गप्प असत. आपल्या हृदयाला रुतणारे हें शल्य तें कुणालाच बोलून दाखवित नसत. माया, ब्रह्माच्या फसव्या नि मोहक तत्वज्ञानाचं पांघरुण घेऊन, चिंतूअण्णा आपलं शल्य दडवून ठेवण्याची शिकस्त करीत.

पण आपल्या लाडक्या हनुमंतासमोर, त्यांनीं कित्येकवेळां आपलं हृदय मोकळं केलं होतं. पाणावलेल्या नेत्रांनीं त्याची करुणा भाकली होती. पण त्यांच्या विनवण्या नि प्रार्थना आजपर्यंत तरी फुकटच गेल्या होत्या.

चार वर्षांपूर्वी द्वारकेची आई वारली. नि आपल्याला पुत्र होईल ही त्यांची आशा कायमची दुरावली. द्वारकीच्या जन्माआधीं पुत्रप्राप्तीचा एक प्रसंग त्यांच्यावर आला होता. पण तिथं दुर्दैव आड आलं. अकालीं गर्भपात होऊन तो गर्भ पडून गेला. चार महिन्याची ती अंकुरलेली गांठ खाड्यांत टाकतांना त्यावेळीं त्याना विशेष दु:ख झालं नाहीं. पण आज त्या प्रसंगाची आठवण झाली कीं त्यांचा उर भरून येतो. तो गर्भ जगला, वांचला असता तर आज सुबोधसारखा एक जवान झाला असता. पण झालं होतं भलतंच.

द्वारकीच्या पाठीवर त्यांना एकही अपत्य झालं नाहीं. आपल्याला मुलगा होईल, या आशेवर ती दोघंही जगत होती. पण जसजसे दिवस जाऊं लागले, तसतशीं ती आशाही दुरावूं लागली. चिंतूअण्णा नि त्यांची पत्नी दोघंही खिन्न झाली होती. नि अशावेळीं त्या खाड्यांत टाकलेल्या चार महिन्याच्या गर्भाची त्यांना आठवण होई. एकमेकांच्या खांद्यावर मान टाकून ते मूक रुदन करीत.

सुबोधला पाहिलं, कीं चिंतूअण्णांच्या या साऱ्या स्मृती चाळवल्या जात. पुत्राची आपली भूक शमविण्याकरितांच मारुतीनं त्याला आपल्या घरीं पाठवला

आहे, हा त्यांचा ग्रह ठाम होई. म्हणून तो लवकर बरा व्हावा अशी ते दररोज प्रार्थना करीत होते.

सुबोध बरा झाल्याचा खरा आनंद झाला चिंतूअण्णांनाच. पण तो आनंद निर्मळ नव्हता. मधूनच एक शंका डोकं वर काढी. तो आतां पूर्ण बरा झाला आहे. आतां तो इथं राहणार नाहीं. तो निघून जाईल, नि आपल्याला त्याला अटकाव करतां येणार नाही. नि मग त्यांच्या साऱ्या आनंदावर विरजण पडे. तो बरा व्हावा म्हणून ते रात्रंदिवस शुश्रूषा नि प्रार्थना करीत होते. नि आतां तो बरा झाल्यावर, त्यांच्या स्वार्थी मनाला वाटे, उगाचच इतक्या लवकर तो बरा झाला. जरा दुखणं लांबलं असतं, तर तितका अधिक सहवास आपल्याला लाभला असता. मग या असल्या भयंकर विचाराची त्यांनाच शरम वाटे. आपल्या स्वार्था-साठीं, आपण दुसऱ्याच्या प्राणाशीं खेळ खेळण्याचा विचार करतोय, नि तो दुसरा कोणी नसून आपल्याला प्रिय झालेला सुबोधच आहे.

आपल्या या शरमलेल्या मनाला आनंदित करण्यासाठीं सुबोधला शक्य तितकं राहवून घेण्याची कोशीस करावयाची असं त्यांनीं ठरवलं.

त्यांच्या या खळबळीची सुबोधला कल्पनाही नव्हती. तो आपल्याच विचा-रांत गर्क होता. आता पुढें काय हा प्रश्न त्याच्या समोर उभा होता.

लिंबगांव त्याला आवडलं होतं. पण असं दुसऱ्याकडे किती दिवस तुकडे मोडीत पडावयाचं? चिंतूअण्णा सज्जन होते. पण त्यांच्या सज्जनपणालादेखील सीमा असतीलच! कायमचं इथं राहणं शक्य नव्हतं. नि राहून तरी करायचं काय? इथूनचा मुक्काम लवकरच हलवला पाहिजे ही गोष्ट निश्चित. केव्हां जायचं नि कुठं जायचं हाच प्रश्न होता. सुकाणू नसलेल्या गलबतासारखी त्याची स्थिति झाली होती.

चिंतूअण्णा त्याच्या एका पैलाही शिवावयास तयार नव्हते. शास्त्रीबुवांचे औषधाचे पैसेही घेत नव्हते. त्यामुळें सुबोधला चिंतूअण्णांकडे राहणं ओशाळं वाटूं लागलं होतं.

सुबोधच्या मनांत चाललेली ही चलबिचल, चिंतूअण्णांच्या नजरेतून निसटली नाहीं. त्याला ओशाळं वाटूं नये म्हणून ते म्हणाले, "सुबोध, तुम्हांला

अजूनही विश्रांतीची जरूरी आहे. उगीच जाण्याची घाई करूं नका. मी तुम्हांला माझ्या मुलासारखा मानतो. म्हणूनच तुमच्या पैशाला मी नकार दिला. तुम्हांला लाजविण्याचा माझा हेतू नव्हता. तुम्हीं लागेल तितके दिवस इथं रहा. घर तुमचंच आहे. मी तुम्हांला परके मानित नाहीं. मला ज्यावेळीं पैशाची अडचण पडेल, त्यावेळीं मी तुम्हांला सांगेन. मग तर तुमची हरकत नाहीं ना? आणि हें पहा सुबोध, जत्राही जवळ येत आहे. पितृपक्ष संपला, कीं नवरात्राला झालीच सुरवात; नि अष्टमीला जत्रा. जत्रा संपल्यावर मग करा विचार जाण्याचा."

सुबोधनें न बोलतां मान डोलविली.

—भाग २ रा समाप्त—

भाग ३ रा

# गुरु-कृपा

चिंतूअण्णांच्या प्रस्तावाला संमती देण्याशिवाय, दुसरा मार्ग मला नव्हता. लिंबगांवातलं वास्तव्य मला अप्रिय नव्हतंच. उलट हें गांव सोडून जावसं मला वाटत नव्हतं. त्या निसर्गसुंदर गांवानं माझ्यावर जणूं काय मोहिनीच पसरली होती मुंबईचं तें रुक्ष नि यान्त्रिक वातावरण, नि इथूनचं हें निसर्ग सौंदर्यानं नटलेलं वातावरण. जमीन अस्मानाचा फरक होता दोघांत या खेड्यांतलं प्रत्येक ठिकाण अभिजात सौंदर्यानं नटलेलं होतं. नदीकांठची ती रम्य वनश्री, गर्द छायेंतलं ते मारुतीचं देऊळ, टेकडीवरील महालक्ष्मीचं देवालय, सारीं एकापेक्षां वरचढ होती. मलबार हिलवरील फुलाचे ताटवे, नि प्रमाणबद्ध वाढवलेली हिरवळ, या टेकडी-वरच्या रानझुडूपांपुढें फिकी पडली असती. तें कृत्रिम होतं. हें नैसर्गिक होतं.

मुंबईचं सारं जीवनच यांत्रिक नि कृत्रिम. त्या जीवनांत जिवंतपणाच नाहीं. माणसं यंत्रांची गुलाम झाली आहेत. मुंबईतलं जिणं म्हणजे गुलामीचं जिणं.

उठायच केव्हां, झोंपायच केव्हां, जेवायचं केव्हां, सारं सारं कांहीं अगदीं ठरीव. उठायला उशीर झाला, तर नळराज कोरडे ठणठणीत. जेवायला उशीर झाला, तर खाणावळीच्या बंद दरवाज्याशीं टक्कर घेण्याची वेळ येते. भूक नसली तरी त्या ठरीव वेळेला पानावर बसलंच पाहिजे. उठवत नसलं तरी त्या ठराविक वेळेला उठलंच पाहिजे. सारीं बंधनं. स्वातंत्र्याचं नांव निशाण नव्हतं त्या जीवनांत. बंधनांनीं जखडून गेलं होतं तें जीवन.

उन्हानीं करपून जात असतानादेखील, छत्री डोक्यावर धरून जाणं गांवढळ-पणाचं लक्षण मानलं जात असे. तोंडाचं तारायंत्र होण्याइतकी थंडी असली, तरी अंगावर गरम रग गुंडाळून बाहेर पडणं वेडेपणाचं ठरत असे. गुडघाभर पाण्यां-तून जातांना, धोतर वर खोचून घेणें रानटीपणांत जमा होत असे वाढलेल्या दाढीनं बाहेर पडणं मुष्कील होतं. प्रश्नाकित नजराताबडतोब रोखल्या जात. सुट घातला, तर बूट पाहिजेतच, बूट घालायचे म्हणजे पायमोजे हवेत. धोतर, लेंगा असला, तर बूट निरुपयोगी होत. तिथं चपलाची जरूरी भासे. कोणत्या रंगाच्या इजारीवर कोणत्या रंगाचा कोट पाहिजे, कंठपाश कोणत्या रंगाचा हवा या गोष्टी ठरून गेल्या होत्या.

कपड्याची नि शिष्टाचाराची ही गुलामगिरी इथं नव्हती. या निसर्गसुंदर खेड्यांत त्या गुलामगिरीला थारा नव्हता. लज्जा रक्षण येवढंच कपड्याचं काम होतं. यापेक्षा जास्त किंमत कपड्याना नव्हतीं. सकाळीं उठल्याबरोबर, तोंडाला साबू फांसावा लागत नव्हता इथ केव्हां तरी, चार आठ दिवसांनीं दाढी घोटली तरी चालत असे. वाढलेल्या खुंटाकडे कुणाचंच लक्ष जात नसे. प्रश्नार्थक नजरा इथं नव्हत्या.

हें खेडवळ जीवन म्हणूनच मला आवडत होतं. कृत्रिमतेपासून दूर अस-लेले असं खरखुरं वास्तव जीवन होतं इथं. जीवनांतलं पावित्र्य, इथं अजून कायम होतं. तें अजून विटाळलं गेलं नव्हत त्यांत दांभिकपणाचा प्रवेश अजून झाला नव्हता. जीवनांतली शुचिता नि मांगल्य, नैसर्गिक अवस्थेंत म्हणून राहिलं होतं. आणि म्हणूनच हें जीवन मला प्रिय वाटत होतं. इथं माझा कोंडमारा होत नव्हता. मनाविरुद्ध एकही गोष्ट करावी लागत नव्हती. ‘लोक काय म्हणतील’ याचा विचारही करावा लागत नव्हता.

आजारीपणांत बंद पडलेल्या माझ्या मनगटी घड्याळाला मी अजून चावीही दिली नव्हती. तें परत चालूं करण्याची मला ईच्छाच नव्हती नि तशी जरूरीही मला भासत नव्हती. ठराविक गाडी पकडण्याची भगभग आता माझ्या मागं नव्हती. किती मिनिटं, ही कालगणना मी विसरलों होतो. नव्हे मला विसरावी लागली होती आंता सूर्य किती कासऱ्या वर आला हे अदाजान ठरवून, काम होत होती. दिन–दर्शिकेंत पाहिल्याशिवाय, आज कोणती तारीख आहे; हें निश्चित सांगता येत नव्हतं.

एका नव्या जगात मी वावरत होतो जणूं काय माझ्या स्वप्नातल जग साकार होऊन माझ्या समोर उभं होतं. आणि पूर्वीच माझं जग, माझं जीवन मला आतां स्वप्नवत् वाटू लागल होत. मुंबइतलं तें जीवन आणि आता कंठीत असलेलं हें जीवन ! दोन ध्रुवाचं अंतर होतं त्यात. स्वप्न कोणतं, याचाच मला प्रश्न पडे. मुंबईत जें जीवन मी जगलों, तें स्वप्न होतं, कीं आतां जें जीवन मी पहात आहे तें स्वप्न

पण तेंही स्वप्न नव्हतं, नि हेंही स्वप्न नाहीं. त्या जीवनांतला माझा सागाती, इथंही तितक्यात आपुलकीनं माझी सोबत करीत होता. माझा दिलरुबा, माझा प्रेमळ सांगाती माझ्या सुखदु·खाचा साक्षीदार. सुमित्रेच्या ओळखीचा यमनकल्याण नि तिच्या विरहाची भैरवी याच दिलरुब्यानं मला ऐकविली होती. सुमित्रेच्या प्रथम भेटीच्या वेळीं, कारंजाप्रमाणें थुई थुई उडणाऱ्या माझ्या हृदयाला, त्याच दिलरुब्यानें प्रेमानं साथ दिली होती, नि तिच्या विरहामुळें दु खाश्रू गाळणाऱ्या त्याच हृदयाचं करुणरम्य झंकारांनी सात्वंन केलं याच दिलरुब्यानं.

वृंदेची आठवण आंता पार बुजून गेली होती मी तिला विसरूनच गेलों होतो. त्या मानिनीनं माझा अहंकार दुखावला होता. माझा तेजोभंग केला. होता. तिच्या आठवणीनं माझे ओंठ आंवळले जात. माझी मानखंडना करणारी अभिमानी वृंदा. त्या आढ्यतेखोर पोरीच्या सहवासांत, माझा भास्करराव झाल्यावांचून राहिला नसता. निदान आज तरी मला असं वाटतं.

पण सुमित्रा तिच्याहून वेगळी होती. तिची ती कारुण्यपूर्ण नजर आजही माझ्यासमोर येते. तिचे ते पाणावलेले नेत्र. अश्रूभरल्या नेत्रांनीं तिनं माझा निरोप घेतला होता.

पण तिनं माझ्याशी कपट केलं होतं. तें कपट स्वेच्छेनं केलं नव्हतं. त्या कपटाचा सूत्रधार दुसराच होता. त्या कपट नाटकाला तिला संमती द्यावी लागली होती. तिच्या अश्रूभरल्या नेत्रांनीं ही गोष्ट एकदम उघडी करून टाकली होती पण त्या विचित्र प्रसगांतून बाहेर पडण्याचा दुसरा मार्गच नव्हता.

सुमित्रेबद्दल आजही मला हळहळ वाटते. ती इथं, माझ्या संगतींत असावयास पाहिजे होती. माझं सुख द्विगुणीत झालं असतं. पण' '

सुमित्रेची आठवण पडली कीं आजही मी बेचैन होतो जिला विसरण्याकरता मी इतक्या दूर, एका अनोळखी खेड्यांत येऊन पडलों होतों, ती इथंही माझा पाठपुरावा करीत होती. तिच्या आठवणी छायेसारख्या माझ्या माग फिरत होत्या

× × × ×

सुख आता माझ्या सेवेला हजर होतें. माझ्या साऱ्या इच्छा, माझी सारी स्वप्नं आता फलद्रूप झाली होती. यन्त्राच्या गुलामगिरीतून मुक्त होऊन मी निसर्गाच्या सान्निध्यात आलों होतो. नागरी जीवनातल्या खटखटी नि मनस्ताप इथं माझ्यामागें नव्हत्या निसर्गसुंदर खेड्याचं, जें स्वप्न माझ्या डोळ्यासमोर तरळत होतं, तें जणू यक्षिणीच्या काडीनं साकार होऊन माझ्या पुढ उभं राहिलं होतं. मला इथं कशाचीच उणीव नव्हती.

खाणावळींतल कदान्न इथं माझ्या वाट्याला येत नव्हतं. साधच पण रुचकर जेवण नि जिव्हाळयाची आपुलकी हा जिव्हाळा, एव्हढी आपुलकी माझ्या आप्तेष्टांनीं देखील कधी दाखविली नव्हती. आपुलकीची ओळख सुमित्रेनं मला करून दिली होती. पण सुमित्रेची आपुलकी नि द्वारकेची आपुलकी किती फरक होता दोघींत ! सुमित्रेची आपुलकी थोडीशी कां असेना पण स्वार्थमूलक होती माझ्याबद्दल तिच्या ज्या भावना होत्या, त्या भावनेंत या आपुलकीचा जन्म झालेला होता पण द्वारका !

चिंतूअण्णापेक्षां द्वारका जास्त प्रेमळ होती. आईच्या वात्सल्यान ती प्रत्येकाची विचारपूस करीत असे. दारावरचा भिकारीदेखील तिला दुवा दिल्याशिवाय पुढे जात नसे. द्वारका म्हणजे वात्सल्यमूर्ति होती. सारेजण तिला ताईच म्हणत. ताई म्हणजे विसाव्याचं स्थान होतं. आल्या अडचणींना मदत करणारी, दुःखाचं सात्वन करणारी ती एक शापभ्रष्ट देवता होती. द्वारकेच्या संगतींत दुःख ठरत नसे.

सुंदर स्त्रियांत तिची गणना कुणीच केली नसती. पण ती कुरूप नव्हती सुरकुतलेल्या कातड्याला, स्नो पावडरचा गिलावा फांसून, आपल्या भकास चेहऱ्याला " सौंदर्य " आणणाऱ्या शहरी बाहुल्यांपेक्षा, द्वारका शतपटीनं आकर्षक होती. झाडावर नुकत्याच फुललेल्या एकाद्या फुलासारखी ती नेहमींच टवटवीत दिसे. ही टवटवी, हा तजेला, शहरी बाहुल्यांच्या चेहऱ्यावर मला कधींच आढळला नाहीं. असलं रसरसीत तारुण्य शहरांत दुर्मिळ होतं.

आज ही तुलना करण्याची मला संधि मिळाली म्हणून. नाहींतर या फरकाची जाणीव मला झालीच नसती. वृंदा नि सुमित्रा आपापल्या परीनं सुंदर होत्या. पण द्वारकीच्या निरोगी सौंदर्यापुढें तिच दिखाऊ सौंदर्य खचितूच फिक्क पडलं असतं.

पण सुमित्रेला मी विसरूं शकलों नाहीं. जिची आठवण विसरण्याकरतां मी मुंबई सोडून इतक्या दूर, या एकाकी खेड्यांत आलों होतो त्या सुमित्रेची मला दररोज आठवण पडत असे दिलरुबा काढला कीं, आपल्या भावपूर्ण नेत्रांनीं माझ्याकडे पहात बसणाऱ्या सुमित्रेची मूर्ति माझ्या डोळ्यासमोर उभी राही. मला वाटे, खरंच सुमित्रा इथं असायला हवी होती. या निसर्गसुंदर खेड्यानं ती वेडावून गेली असती.

पुन्हा मुबईला जावं, सुमित्रेची गांठ घ्यावी नि तिचं मन वळवून इथं परत स्थाईक व्हावं, असं माझ्या मनांत येई पण असं जाण्यांत कांहींच अर्थ नाहीं. सुमित्रा येणें अशक्य आहे याची जाणीव मला होई, नि मग स्वस्थ बसण्याशिवाय मला गत्यंतर उरत नसे.

सुमित्रेशीं मी अजूनही प्रामाणिक होतों. मी तिला लग्नाचं वचन दिलं होतं. आजही मी माझा शब्द खरा करण्यास तयार होतो. सुमित्रा मला हवी होती. प्रेम वगैरे मी कांहीं जाणीत नाहीं. त्या भानगडी अजूनही मला अज्ञात आहेत. सुमित्रेनं माझ्यासाठीं जें काहीं केलं होतं, तें मी विसरूं शकत नव्हतो. तिनं जो जिव्हाळा दाखविला, जी आपुलकी दाखविली, ती मला अज्ञात होती. माणुसकीचं दर्शन प्रथम तिनेंच मला करून दिलं. कदाचित् याच उपकारबुद्धीच्या जाणीवेमुळें मी तिला विसरूं शकत नव्हतों.

सुमित्रेच्या वियोगाचं दुःख आतां बरंचसं सहनीय झालं होतं. त्या दुःखाची तीव्रता आतां बोथटली होती. तिची आठवण मला बेचैन करीत असे हें खरं, पण ही बेचैनी फार थोडा काळ टिकत असे. संवयीनं मनुष्य सारं कांहीं करूं शकतो. तिच्याशिवाय जगण्याची आतां मला चांगलीच संवय झाली होती.

आईच्या वात्सल्यानें काळजी घेणारी द्वारका इथं होती, वडिलांची उणीव भासूं न देणारे चिंतूअण्णा होते, नि जी स्वप्नसृष्टी मला वेडावून टाकीत असे, त्या स्वप्नसृष्टींत मी आज वावरत होतों, तरीही मी सुखी नव्हतों. कसलीतरी अनामिक हुरहुर मला बेचैन करीत असे. माझ्या या जीवनांत कसली तरी उणीव आहे, तें अपुरं आहे, असं मला वाटे, आणि ही अपुरेपणाची जाणीव मला स्वस्थ बसूं देत नसे.

रिकाम्या घरांत खुडबुडणाऱ्या उंदरांप्रमाणें माझ्या रित्या मनांत विचारांची गर्दी उठत असे. त्या विचारांना ना शेंडा ना, बुडखा. असंबद्ध नि तितकेच पोरकट विचार. देवळाच्या पायरविर बसून, मी ईश्वराच्या अस्तित्वाचा विचार करीत असे. जग कुणी निर्माण केलं, कां केलं, कसं केलं, हा निर्माणकर्ता होता कुठं ? ही उठाठेव त्यानं कां केली ?

नि या असल्या प्रश्नाची उत्तरं शोधण्याचा मी प्रयत्न करीत असे. डोके-फुटीशिवाय दुसरं कांहींच माझ्या पदरांत पडत नसे.

इथं देखील ती एकलेपणाची जाणीव मला भुंग्यासारखी पोखरीत होती. आपुलकीच्या या महापुरात असूनही मी कोरडाच होतो माझ्या भोवतालचं सारं जग आपापल्या कार्यांत दंग होतं. इथं रिकामं कोणीच नव्हतं. चिंतूअण्णा सकाळीं जे जात, ते मध्यान्हीला जेवण्याकरता येत. जेवण, थोडीशी वामकुक्षी, नि पुन्हा ते शेतावर जात, ते दिवेलागणीच्या वेळीं घरांत शिरत. घरातदेखील ते स्वस्थ नसत. दूध काढणं, गुरांना चारापाणी देणं ही कामं चालूंच असत.

त्या चिमकुल्या खेड्यांतला प्रत्येकजण कार्यमग्न होता. मोकळा होतो तो मीच. मला कांहींच काम नव्हतं इथं. चिंतूअण्णा मला काहीं करूं देत नसत; नि मला कांहीं जमणं शक्य नव्हतं. शहरी वातावरणांत मी वाढलेला होतो. या खेडवळ जीवनाची मला ओळख नव्हती.

दिलरुबा छेडणं नि मनसोक्त भटकणं येव्हढंच मी करूं शकत होतो. पण त्याचादेखील मला आता कटाळा आला होता. मन गुंतवण्याकरतां कांहींतरी करावयास पाहिजे होतं पण काय करतां येणं शक्य होतं मला? मला करता येण्याजोगं काम इथं नव्हतंच मुळीं. खरं म्हणजे, मलाच कांहीं येत नव्हतं कारकूनीशिवाय इतर उपजीविकेचा धंदा मला माहीत नव्हता. कारकुनी नि दिलरुबा या ठराविक रिंगणांत फिरणारा मी, मला हें नवं-जीवन अज्ञात, अगम्य होतं. त्या खेडवळ जीवनाशीं मी म्हणूनच समरस होऊं शकत नव्हतों

शारिरीक कष्टाची मला संवय नव्हती. मी होतो सुखासीन नि आळशी. म्हणूनच अंग मोडून मेहनत करण्याची मला इच्छा होत नव्हती. पण या निरंकुश जीवनात मला आता गोडी वाटत नव्हती. दिवस मला खायला उठत. वेळ जाता जात नसे. प्रत्येक उजाडणारा दिवस मला अधिकाधिक उदासीन करी.

निरंकुश जीवनाबद्दल माझ्या ज्या गोड अपेक्षा होत्या, त्याना प्रत्यक्ष वस्तु-स्थितींनं सुरुंग लावला होता. काहीतरी उद्दिष्ट डोळ्यांसमोर असल्याशिवाय जगणं अशक्य आहे अन्न, पाणी नि हवा हीं जीवनधारणेस जितकी आवश्यक आहेत, तितकीच आवश्यकता कामाची आहे. काहीतरी काम, काहींतरी उद्दिष्ट हें डोळ्या-समोर पाहिजेच पाहिजे. त्याशिवाय जीवनात गति येणार नाहीं. गतिशून्य जीवन, म्हणजे डबकं.

खिडक्या, दरवाजे बंद करून, अधारावर चरफडणाऱ्या माणसासारखी माझी गत झाली होती माझ्या सभोवार पसरलेला निसर्ग, गतिमानतेचं महत्व, माझ्या कानीं कपाळीं ओरडून सांगत होता. पण मी मात्र तिकडे दुर्लक्ष करून उगाचच कुढत बसलों होतो निसर्गाच्या सान्निध्यांत जीवनाचा साक्षात्कार होतो हा साक्षात्कार प्रत्यही पहात असतानादेखील माझे डोळे उघडले नव्हते.

पण ही गति आणायची कुठून? मुंबईला परत जाणं येव्हढंच मी करूं शकत होतो. पण पुन्हां मुंबईस जाण्यास मी नाखूष होतो. धडे पुन्हा विसरलेले शिकविण्याची माझी तयारी नव्हती.

एका विशिष्ट वातावरणांत मी लहानपणापासून कोंडला गेलों होतो. त्या एकलकोंड्या जीवनांत मी स्वतःपुरतंच एक निराळं विश्व निर्माण केलं होतं, त्या

जीवनांत इतरांना प्रवेश नव्हता मी नि माझ्या गरजा या व्यतिरिक्त इतराना मज्जाव होता. बाहेरच्या जगाची मला ओळख नव्हती. त्या जगाकडे मी कधी डोकं वर करून पाहिलं नाहीं. जगाच्या उलाढाली मला अज्ञात होत्या देशांतल्या वावटळी पासून मी दूर होतो. मला मित्र नव्हते मित्र जोडण्याचा मी कधींच प्रयत्न केला नाहीं. मला ते नकोच होते. आप्तेष्टाची बंधनं मी झुगारून दिली होती. आपल्याच पोटांतून निघालेल्या बधनात, रेशमी किडा जसा अडकून पडतो, तसा मीदेखील. माझ्या विशिष्ट वागणूकीनं असाच एकाएकी अडकून पडलों होतो. मी आत्मनिष्ठ होतो. हीं रेशमी बंधन तोडूनच त्या कीड्याला बाहेर पडणं भाग पडतं. आत्मपूजनाची ही वलयं भेदल्यावाचून मला दुसरा मार्ग नाहीं.

जगाच्या पाठीवर मी कुठंही गेलों, तरी मी असंतुष्टच राहीन. आज लिंबगाव सोडण्याचा मी विचार करीत आहे. उद्या दुसऱ्या एकाद्या खामगावला गेलो, तरी हेच, त्यात बदल होण्याचा सुतराम् सभव नाहीं

लिंबगाव सोडण्याची गोष्ट मी चितूअण्णाकडे म्हणूनच काढित नव्हतो.

चार माणसात मिसळण्यात जो आनंद असतो, त्याचा प्रत्यय मला जत्रेच्या दिवशी आला.

आत्मपूजनाची वलयं तोडण्याचा निश्चय मी मागेच केला होता. त्या निश्चयानुसार वागण्याची मी सुरवातही केली होती. मी शिकलेला, मी मुंबईकर म्हणून प्रथम गावकरी माझ्याशी, तेव्हढ्या मोकळेपणानें बोलायला धजत नव्हते. पण त्यांच्याचपैकीं एक या भावनेनें जेव्हा मी वागण्यास सुरवात केली, तेव्हा ते अत्यंत आपुलकीनं माझ्याशीं बोलूं लागले माझ्यातला मीपणा जेव्हा अंर्तधान पावला, त्याचवेळीं त्याच्या सुखदुःखाशीं समरस होण्याची शक्ति माझ्यात निर्माण झाली.

या अज्ञानी नि दरिद्री शेतकऱ्याच्या आपुलकीचं दर्शन जत्रेच्या वेळीं मला झालं. न कळत, मी त्यांचा पुढारी झालों त्याच्या जीवनाची मला माहिती नव्हती. त्यांच्या सुखदुःखाची मला कल्पना नव्हती. त्याच्या उणीवा, त्यांच्या अडचणी मला अज्ञात होत्या पण ते कष्टाळू शेतकरी होते त्यांच्यांत माणुसकी होती वरून रखरखीत दिसणाऱ्या, त्यांच्या शरीरांत माणुसकीचा झरा अजूनही होता. शहरी यंत्रासारखे ते अजून शुष्क झाले नव्हते.

मुंबईत दिवस काढले असल्यामुळें, मला जत्रा विशेष आकर्षक वाटली नाहीं. पण त्या शेतकऱ्यांच्या दृष्टीनं ती एक पर्वणी होती. खेळाची नि मिठाईची दुकानं, रंगी बेरंगी रबरी फुगे, चक्र नि पाळणे या गोष्टींत मला आनंद वाटत नव्हता. पण जत्रेंत मी खूप फिरलों द्वारकीला बरोबर घेऊन बरीचशी खरेदी केली. चिंतूअण्णांनीं माझ्याकरता जे काहीं केलं होतं, त्याची परतफेड कशी करावी असा माझ्यापुढें एक प्रश्नच होता. जत्रेची ही पर्वणी साधून त्यांतून, अंशतः तरी उतराई होण्यासाठीं म्हणून, मी ही युक्ति योजली होती.

अष्टमीला जत्रेची सुरवात झाली. त्याच रात्रीं देवीपुढे माझं दिलरुबावादन झालं. झालं म्हणण्यापेक्षां मला करावं लागलं, असंच म्हटलं पाहिजे. मी दिलरुबा वाजवावा ही कल्पना द्वारकीची. चिंतूअण्णाना ती एकदम पसत पडली. नि इतराच्या आग्रहाची भर. मी बिनतक्रार त्यांची सूचना मान्य केली.

मनोहरची नि माझी ओळख झाली ती या दिलरुबावादनामुळें. भैरवी छेडून मी दिलरुबा गवसणींत टाकला देवीला नमस्कार करून, मी फिरत होतो, पण कुणीतरी पाठीवर हात टाकल्यामुळें एकदम वळलों. खादीच्या शुभ्र पोशाखांतली एक व्यक्ति माझ्या समोर उभी होती.

प्रथम दर्शनीच ज्यांच्याबद्दल आदर वाटूं लागतो, अशा व्यक्तिमध्यें मनोहरची गणना करावयास हरकत नाहीं. भरपूर उंची नि सतेज गौर अगकांतीं यामुळें ते त्या समुदायांत उठून दिसत होते. किंचित् हंसत त्यानें हात जोडीत म्हटले, "नमस्ते कलावंत. बहार केलीत आज. इतकं सुंदर दिलरूबावादन बरेच वर्षांत ऐकलं नव्हतं."

त्यांना प्रतिनमस्कार करून मी गप्प उभा राहिलों. काय बोलावं हेंच मला समजत नव्हतं. नि अनोळखी व्यक्तीजवळ बोलायचं तरी काय ? मला त्याचं नांवही माहीत नव्हतं. कोणीतरी वडी व्यक्ति आहे, येव्हढाच निष्कर्ष मी काढूं शकत होतो.

यापूर्वी मी या व्यक्तीला लिंबगांवात पाहिलंसुद्धां नव्हतं. या अनोळखी व्यक्तीबद्दल कुणी बोलताना ऐकलंही नव्हतं. पण गांवकऱ्यांशीं ते ज्या मोकळेपणानें वागत होते, त्यावरून त्यांचा परिचय बराच जुना असला पाहिजे, असं अनुमान काढणं चुकीचं ठरलं नसतं.

मी संकोचून उभा होतो. आपला प्रेमळ हात माझ्या खांद्यावर ठेवित ते म्हणाले. "चला कलवंत, आपण बाहेर मोकळ्यावर बसूं."

सभामंडपांतून आम्हीं बाहेर पडत होतो, इतक्यांत चिंतूअण्णा आम्हांला सामोरे आले. मनोहरांना नमस्कार करीत ते म्हणाले, "नमस्कार पंत. आमच्या सुबोधचा कार्यक्रम कसा काय आवडला तुम्हांला ?"

"उत्तम. बऱ्याच वर्षांत असलं दिलरुबावादन ऐकलं नव्हतं. कुणाजवळ शिकलांत तुम्हीं "

"भास्करराव काळे म्हणून आपचे एक शेजारी होते, त्यांच्याकडेच माझं सारं शिक्षण झालं ते स्वत· हुसेनखांचे शिष्य."

"अस्सं आता आलं लक्षात. हुसेनखांची सतार मीं ऐकलेली आहे. त्याच्या सतारीचे ते अवीट सूर आजही माझ्या कानांत निनादत आहे. तुमचा दिलरुबा ऐकला, नि मला हुसेनखाच्या त्या अविस्मरणीय सतार वादनाची आठवण झाली. इतक्या कोंवळ्या वयात तुम्हीं हस्तगत केलेलं कौशल्य कौतुकास्पद आहे."

या स्तुति वर्षावानं मी लाजून चूर झालों.

"पुन्हा एकदां तुमचं दिलरूबावादन ऐकलं पाहिजे. कानांची अजून तृप्ती नाहीं झालेली. ऐकवाल कां ?"

"इच्छा असेल त्यावेळीं."

"पण तुमचा मुक्काम किती दिवस आहे इथं ?"

"तें कांहीं निश्चित नाहीं सांगतां येणार मला. जत्रेपर्यंत राहण्याचं मी चितूअण्णांना आश्वासन दिलं होतं· जत्रा दोन दिवसांत संपून जाईल."

"कुठं मुंबईला जाणार काय ?"

"मुंबई ! छे· छे. कंटाळा आला म्हणून मुंबई मी सोडली. आतां पुढें कुठं जायचं हेंही निश्चित् नाहीं. जायचं येव्हढं खरं, पाय नेतील तो रस्ता नि थांबूं तें मकाण."

"अजब आहांत तुम्हीं सुबोध. तुमच्या बोलण्याचा मला कांहींच अर्थबोध होत नाहीं. कसलंतरी दुःख विसरण्याचा तुमचा खटाटोप चाललाय असं वाटतं, तुमच्या बोलण्यावरून."

" तसंही असेल. मला काय होतंय, हें माझं मलाच नीट समजत नाहीं. "

" तुमची कहाणी एकवार ऐकलीच पाहिजे. दिलरुबा ऐकविण्याचं तुम्हीं कबूल केलच आहे. "

" होय, पण केव्हां येतां ? "

" तें आजच सांगता येणं कठीण आहे. पाठीमागं कामं बरीच आहेत. कामांतून मोकळीक मिळतांच तुमची गांठ घेईन. पण मला भेटल्याशिवाय तुम्हीं इथून जाऊं नका. "

" बरं आहे "

" नुसतं आश्वासन नकोय मला, तसं वचन द्या "

मनोहरचा हात मी हातांत घेऊन वचन दिलं.

" पण अंदाजे किती दिवसांनीं भेटाल ! " मी त्यांना विचारलें. " तें जर मला सांगतां आलं असतं, तर मलाच फार आनंद झाला असता. कदाचित् एकाद्या आठवड्यांनीं परत येईन. कदाचित् एकादा महिनाही लागण्याचा संभव आहे. पण मी येईन हें निश्चित्. तोंपर्यंत तुम्हीं जाऊं नका. या खेड्यांत तुमचा वेळ जात नसेल म्हणून तुम्हीं जास्त कंटाळला असाल. खरं ना ? बरं मी तुम्हांला थोडीशीं पुस्तकं पाठवून देईन. बरं आहे निघतों मी आता. "

असं म्हणत मनोहर चालूं लागले.

माझ्याबद्दल चिंतूअण्णांचा काय ग्रह झाला होता याची मला कल्पना नव्हती. माझ्याबद्दल त्यांना येव्हढी आपुलकी कां वाटावी हें मला समजत नव्हतं. तसं उघड विचारणही शक्य नव्हतं. नव्हे हा प्रश्न वेडेपणाचा होता. पण या प्रश्नाचं उत्तर जाणण्यास मी फार उत्सुक होतो.

या आपुलकीचं पर्यवसान आतां अभिमानांत झालं होतं. पाहुण्याच्या रांगेंतून आतां माझी हकालपट्टी झाली होती, " आमचा सुबोध " हे शब्द अण्णांच्या तोंडांत घोळले जात होते. नि " सुबोध दादा " ही द्वारकीनं दिलेली पदवी होती. अण्णाच्या कुटुंबांत आतां माझा समावेश झाला होता. म्हणूनच जत्रेच्या वेळीं मी केलेल्या उधळपट्टीबद्दल, अण्णांनीं मला ज्या गोष्टी ऐकविल्या, त्याकडे मला विशेष लक्ष पुरवावस वाटलं नाहीं. आपल्या लाडक्या लेकानं केलेल्या उधळपट्टीला, एकादा प्रेमळ पिता, ज्या सुरांत धमकावतो, तीच भावना त्या शद्बामागं होती.

दिवाळी उलटून गेली तरी मनोहरचा ठिकाणा नव्हता. कबूल केल्याप्रमाणें, मध्यंतरी त्यांनीं पुस्तकं पाठवून दिली होती; व त्याचवेळीं एकाद आठवड्यांत येतो, अशी चिठ्ठीही पाठविली होती. पण या गोष्टीला पंधरवडा उलटून गेला होता. ते आज येतील उद्या येतील, अशी मी मात्र वाट पहात बसलो होतों.

मनोहरबद्दल मला विशेष अशी माहिती नव्हती. संभाषणाच्या ओघांत चिंतूअण्णानीं, त्याना माहित असलेली थोडीशी हकीगत मला सांगितली होती. पण त्यांत गुणवर्णनाचा भाग अधिक होता. त्यांचा त्याग, ते घेत असलेले कष्ट, त्यांनीं भोगलेला तुरुंगवास इत्यादिकांची सुरम्य वर्णनंच मला ऐकावयास मिळाली.

मनोहर कॉंग्रेसचे एक बडे कार्यकर्ते होते. तालुका कॉंग्रेसचे ते एक पदाधिकारी होते. त्यामुळें त्यांच्यामागें हजार कामं होती. म्हणूनच ते मला भेटूं शकत नव्हते. सर्व कामं दूर सारून माझ्या भेटीला धांवण्याइतका मी मोठा नव्हतो. इतकी माझी योग्यताही नव्हती. ते ज्या कामांत मग्न होते, त्या कामापुढें मी म्हणजे कःपदार्थ होतो.

मनोहरांनीं जीं पुस्तकं पाठविली होती, त्यांत गांधीवादावरील पुस्तकांचा भरणा जास्त होता. सत्याचे प्रयोग हें गांधीजींचं आत्मचरित्रही त्यांत होतं. मला राजकारणांत गोडी वाटत नव्हती. राजकारणाचं माझं ज्ञानही बेताबेताचंच होतं. पण सत्याचे प्रयोग मला आवडले. म्हणूनच गांधीवादावरील भाष्यें मी वाचून काढली. 'समृद्ध खेडीं' या नांवाचं एक छोटसं पुस्तक त्यांत होतं. खेड्यांची पुनर्घटना कशी करावी, परिस्थितीनुसार कोणते धंदे खेड्यांत करतां येतील, गोधनाचं महत्व, खादी आणि चरखा इत्यादि अनेक विषयांचा त्यांत थोडक्यांत पण मुद्देवार परामर्ष घेतलेला होता. तें पुस्तक मला फार आवडलं.

राजकारणाचा धकाधकीचा मामला माझ्यासारख्या सुखासीन नि आळशी माणसाला झेंपणारा नव्हता. पण या पुस्तकांत दिलेल्या माहितीचा उपयोग करून, मी राजकारणाशिवाय इतर उद्योगांत माझं मन गुंतवूं शकत होतो. मला कांहींतरी काम हवं होतं. अण्णा आणि द्वारकी यांना दुखवण्याची माझी इच्छा नव्हती. मी लिंबगांव सोडून जाऊं नये, असं अण्णांना फार वाटे. माझ्या जाण्यानं त्यांना दुःख झालं असतं. नि हें निसर्गसुंदर गांव सोडावयास मीही नाखूष होतो. मला इथं

रहावसं वाटत होतं. पण जाण्याचा मी जो निश्चय केला होता, तो गांवाचा कंटाळा आला म्हणून नव्हे, तर इथं राहून माझा वेळ जात नव्हता म्हणून. पण माझा वेळ सत्कारणीं लागण्याजोगं कार्य मला आतां सांपडलं होतं.

सुदैवानं माझ्याजवळ पैसा होता. त्या पैशाचा विनियोग वाटेल तसा करण्यास मी मुखत्यार होतो. माझ्या मागं प्रपंचाचं लोढणं नव्हतं. प्रयोगापायीं मी कफल्लक झालों तरी मला शिव्याशाप मोजणारं कुणीच नव्हतं.

माझा निश्चय मी अण्णांना अजून सांगितला नव्हता. माझी खात्री होती कीं, अण्णा आनंदानं नाचले असते, नि तितकाच आनंद द्वारकीलाही झाला असता. मनोहरपंतांचे विचार मला अजमावून पाह्यचे होते. म्हणूनच मी थांबलों होतो.

त्यांच्या प्रथम भेटीपासूनच त्यांच्याबद्दल मला आदर वाटूं लागला होता. त्यांच्या सल्ल्याशिवाय कांहीं करूं नये असं मला वाटत होतं या माणसाच्या हातीं आपलं भवितव्य सोंपवलं, तर त्याचं सार्थक झाल्यावांचून राहणार नाहीं असा विश्वास मला वाटूं लागला होता. ही विश्वासाची भावना कशी उद्‌भवली हें मी सांगूं शकत नव्हतों. पण दिवसेंदिवस ती दृढमूल होत होती. मनोहरपंतांची मी उत्सुकतेनें वाट पहात होतो येव्हढ्यासाठींच.

+ + + +

कापणीचा हंगाम जोरांत होता. उभ्या दिवसांत अण्णांचं दर्शन होणं मुष्कील झालं होतं. पौर्णिमेची रात्र होती. पिठूर चंद्रप्रकाशानें सृष्टी न्हाऊन निघाली होती. दमले भागलेले शेतकरी निद्राधीन झाले होते. गांव अगदीं शांत होतं. निवर शांतता नांदत होती. मधूनच एकादं कुत्रं केंकाटत होतं. नि त्यामुळें ती शांतता भंगून जाई.

मला झोंप येईना. दिलरुबा खांकोटीला मारून मी नदीची वाट धरली.

नदीवरील पूलाच्या पायथ्याला माझी बसण्याची एक ठराविक जागा होती. मी तिथंच बैठक मारली. नदीचा प्रवाह शांतपणें वहात होता. हवेंत थोडासा गारठा भासत होता. माझ्या भोंवतालचं सारं विश्व शांत होतं. पण ती शांतता भेसूर

नव्हती जितका उदात्त तितकीच करुणरम्य शांतता. वाहणाऱ्या प्रवाहांत पडलेलें आस्थिर चंद्रबिंब, नि चंद्राच्या प्रकाशात चमकणार पाणी, मधून मधून ऐकूं येणारी कोल्हेकुई नि कुत्र्यांची भुंकणी, नि टेकडीच्या पायथ्याशीं राहणाऱ्या कातकऱ्याच्या वस्तींतून ऐकूं येणारा ढोलाचा आवाज, या गोष्टींकडं माझं लक्ष नव्हतं. माझ्या डोक्यात विचार होते मनोहरपंतांबद्दलचे. ते का आले नाहींत ? त्याची भेट घ्यावी अशी उत्कंठा मला लागली होती. प्रणयिनीच्या उत्सुकतेनं मी त्याच्या भेटीसाठी तळमळत होतो. त्याना सारं सारं सागून टाकून हृदयावरचं हें जड ओझं केव्हा भिरकावून देतो, असं मला झाल होतं पण त्याचाच ठिकाणा नव्हता " मी परत येईपर्यंत असाच रहा " असं अगस्तीला सागून अंतर्धान पावणाऱ्या नारदासारखे ते जे निघून गेले होते, त्याचा अजून पत्ता नव्हता. माझी कसोटी तर ते पहात नव्हते ना ? कसोटीला उतरल्याशिवाय गुरू शिष्यावर अनुग्रह करीत नाहीं. निरनिराळ्या प्रकारांनीं तो आपल्या शिष्याची परीक्षा घेतो, नि त्यांत उत्तीर्ण झाल्यावरच त्याला गुरूकृपेचा लाभ होतो. शिष्य म्हणून मग त्याला मिरवता येतं. पण ही दीक्षा मिळविण्यापूर्वी अनेक अडचणींचें पर्वत त्याला ओलाडून जावे लागतात.

पुरातन काळापासून चालत आलेली ही भारतीय परंपरा आहे. या परपरेचा आज जवळजवळ लोप झाला होता पण भारतीय संस्कृतीतील सर्वकष मूल्यांचं पुनरुत्थान आज गाधीवाद करीत आहे. अर्थात् त्यांच पूर्वीच संकुचित स्वरूप आता जसंच्या तसं ठेविलं नव्हतं. तर ते जास्त व्यापक नि विस्तृत झाल होतं. मनोहर स्वतः गाधीवादी होते. गांधीवादी मूल्यावर त्यांचा विश्वास होता त्या मूल्यांचा प्रसार करणं हेंच त्याच्या जीवनाचं उद्दिष्ट बनलेलं होतं. म्हणूनच का ते माझी अशी परीक्षा घेत होते ?

पण हा प्रश्न निराधार होता. माझी परीक्षा घेण्याचं त्यांना कारणच नव्हतं. त्यांच्या विशिष्ट जीवनक्रमांत सामील होण्याची मी इच्छाही दर्शविली नव्हती त्यांचा शिष्य किंवा अनुयाई व्हावं असं त्यावेळीं मला वाटलं नव्हतं. आम्हीं बोललों, तें फक्त दिलरुबा वादनासंबंधानं. दिलरुबावादन ऐकण्यासाठीं तें पुन्हां येणार होते. पण त्यांच्या पुस्तकांनीं त्यांच्या चरित्रानीं, माझ्या मनांत जी खळबळ उडविली आहे

त्याची कल्पना त्यांना येण अशक्य होतं. नि मी वेड्यासारखा, उगीचच स्वतःला दोष देत बसलो होतो.

अचानक ब्रेक लागल्यावर, गाडीला जसा हादरा बसतो, तसाच, अचानक विचार साखळी तुटल्यामुळें मी माझ्या तंद्रींतून एकदम भानावर आलों. रात्र बरीच झाली होती ढोलक्याचा आवाज आता ऐकूं येत नव्हता. केंकाटणारीं कुत्रीं आतां गप्प झाली होती.

पण घरीं जाण्याची मला इच्छा होत नव्हती. या ठिकाणाहून उठणंच मला अशक्य झालं होतं. जणूं काय कोणीतरी मला त्या ठिकाणीं जखडून ठेवलं होतं.

नुसतं स्वस्थ बसणं शक्य नव्हतं. पुन्हां विचाराचं दुष्टचक्र सुरूं व्हायचं. आता विचार करण्याची माझ्यांत ताकत नव्हती. गवसणींतला दिलरुबा काढून मी छेडावयास सुरवात केली.

चार दिवसांपूर्वी भजनांत ऐकलेला तुकोबाचा तो अभंग मला आठवला. पांडुरंगाच्या भेटीची आर्तता, किती हळुवारपणें रंगविली होती त्यांत. ती आर्तता आज मला जाणवत होती मीही तितकाच व्याकूळ झालों होतों.

धनुकली तारावर फिरत होती. नकळत त्या अभंगाचीं सुरावट झंकारूं लागली. माझ्या गळ्यांतूनही तेच स्वर उमटूं लागले.

कोठे गुंतलासी योगीयांचें ध्यानीं । आनंद कीर्तनी पंढरीच्या ॥
काय काज कोठें पडलीसे गुती । कानीं न पडती बोल माझे ॥
काय शेषशयनीं सुखनिद्रा आली । सोय कां साडिली तुम्हीं देवा ।
तुका म्हणे कोठें गुंतलेति सांगा । किती पांडुरंगा वाट पाहूं ॥

पण तो अभंग मी पुरा करूं शकलों नाहीं. शेवटच्या चरणावर माझ्या भावनाच एवढ्या अनावर झाल्या कीं, गायन नि वादन हीं एकदम बंद झाली अगतिकपणें मान मागें टाकून मी निपचित पडलों.

माझ्या खांद्यावर हात ठेऊन कुणीतरी हांक मारली " सुबोध "

मी गडबडून उठलों. माझ्या समोर मनोहर उभे होते. पांडुरंगाच्या दर्शनानं तुकाराम जितका आनंदला नसेल, त्याहून जास्त आनंद मनोहरपंतांना पाहताच मला झाला.

हात धरुन मला खालीं बसवत मनोहर म्हणाले, " सुबोध, परमेश्वराला इतक्या आर्ततेनं का आळवित होता ? असं कोणतं संकट तुमच्यावर आलं आहे ? "

"तसं संकट कसलंच नाहीं."

"तुम्हीं गात होता म्हणूनच तुमचा पत्ता लागला मला. नाहींतर मी आपला सरळ चिंतुअण्णांकडे जाणार होतो."

"पण एवढ्या रात्रीं कुठून आलांत ?"

"त्या कातकऱ्यांच्या वस्तींत होतो इतका वेळ. त्यांचा नाच पाहिला. म्हटलं जावं आता फिरत फिरत लिंबगांवला. इतक्यांत तुमच्या दिलरुब्याचे झंकार ऐकले. मी तुमच्यामागें येऊन उभा राहीलो. तुमची गानसमाधि मोडण्याचं धैर्य माझ्यांत नव्हतं. तो क्रूरपणा झाला असता. "

" आतां सरळ घरींच जाऊं या. रात्र फार झाली आहे. "

" होय. नि चांदणही सुंदर पडलेलं आहे. अशा वेळीं झोंपायचं अगदींच अरसिकपणाचं वाटतं मला. पौर्णिमेच्या चांदण्यांत फिरण्याइतकी मौज कशांत नाहीं. तुमची हरकत नसेल तर तुमची हकीगत मला ऐकावीशी वाटते तुम्हीं असुखी आहांत, हे न सांगता समजतं. पण तुमची नि सुखाची, ऐन तारुण्यांत जी तुरलीक झाली आहे, ती कां व्हावी हें समजून घेण्याची माझी इच्छा आहे. मला तुमचा मित्र समजा भाऊ समजा. तुमच्यासारखा कलावंत असा निकामी होऊन पडावा, हें मला पटत नाहीं. माझ्यावर विश्वास आहे का तुमचा ? "

" होय आहे. ईश्वरापेक्षां जास्त आहे. माझ्या हकिगतींत विशेष असं कांहींच नाहीं. एका सामान्य तरुणाची सामान्य कहाणी आहे ती. "

" पण तीच मला ऐकायची इच्छा आहे. "

" ठीक आहे. तुमच्या बाहेर नाहीं. "

माझें पूर्वायुष्य सुसंगतवार मला सांगतां येईलच अशी मला खात्री नव्हती. कशी सुरवात करायची नि कुठून करायची याचाच निश्चय होत नव्हता. मी भांबावून गेलों होतों. मनोहराची झालेली आकस्मित भेट, त्यांचा प्रेमळपणा ही सारीं मला अनपेक्षित होती. त्यांची भेट घ्यावी अशी माझ्या मनाला ओढ लागली

होती, हें खरं. पण ती भेट अशी नि इतक्या मोकळेपणानं होईल अशी मला कल्पना नव्हती. म्हणूनच मी जास्त भांबावून गलों होतो.

माझ्या कहाणींत सांगण्यासारखं कांहींच नव्हत. निदान मनोहरसारख्या माणसाला ऐकविण्याजोगं त्यात कांहींच नव्हतं. ती होती एका आत्मप्रिय माणसाची कहाणी.

पण मला ती मनोहराना सागावी लागली. माझ्या बाळपणापासून मी सुरवात केली. वृंदेची ओळख, नि भास्कररावांचा निरोप, सुमित्रेची ओळख, वाढता परिचय नि त्या ओळखीचा दुःखदायी शेवट. साऱ्या प्रसंगाचा चित्रपट माझ्या डोळ्यांसमोर सरकूं लागला. मी कांहींच लपवित नव्हतों. लपविण्याजोग त्यात कांहींच नव्हतं. मला शरमण्याजोगी एकही घटना माझ्या आयुष्यांत घडलेली नव्हती. फक्त तो आयुष्यक्रम अगदीं सामान्य होता येव्हढंच.

मनोहर लक्ष देऊन ऐकत होते. माझी कहाणी संपण्यास बराच वेळ लागला. चंद्र आतां कलला होता. हवेंत गारठाही खूप पडला होता. सृष्टी निश्चल होती. सारं कांहीं अगदीं स्तब्ध होत. जणूं काय माझ्या या शोककारी कहाणीनं तीही दुःखित झाली होती.

सहानुभूतीनं माझ्या पाठीवर हात फिरवित मनोहर म्हणाले, " सुबोध, ऐकली. तुमची कहाणी, म्हणजे एका आत्मनिष्ठ तरुणाच्या आयुष्याची शोकांकिका आहे. पण हा दोष आयुष्याचा नाहीं परिस्थितीचाही नाहीं. दोष आहे. आयुष्याकडे पाहण्याच्या दूषित दृष्टिकोनाचा. जीवनाचा अर्थच तुम्हांला कळलेला नाहीं सर्वांनाच तो समजतो असंही नाहीं. "

" मलादेखील तो समजला नव्हता. आजही संपूर्णपणें ता मी जाणतों, अशी शेखी मला मिरवितां येणार नाहीं. पण जीवनाचं जें अस्पष्ट दर्शन मला झालं आहे. त्यावरून जीवनाचा हेतू नि अर्थ यांबद्दल मी अंदाज बांधू शकतो येव्हढंच. नि त्याच अंदाजानं मी आज जात आहे. पण त्यांत मला समाधान लाभतं; हें खरं. "

"माझ्याही आयुष्यांत असा एक प्रसंग घडला, कीं ज्यामुळें माझं सारं जीवनच पार बदलून गेलं. तुमच्या आयुष्यांत नि माझ्या पूर्वायुष्यांत विलक्षण

साम्य आहे. म्हणूनच तुमच्या व्यथा मी पटकन् जाणूं शकतों. मीही तुमच्या-सारखा एक सुखासीन नि आळशी तरुण होतों. शिक्षण चालूं होतं, तोंपर्यंत मला विशेष कांहींच वाटलं नाहीं. परीक्षा नि पदवी ही डोळ्यांसमोर होती. पण एम् ए. झाल्यावर आतां पुढं काय हा प्रश्न डोळ्यांसमोर उभा राहीला नोकरी करण्याची आवश्यकता वाटण्यांइतकी गृहस्थिति खालावलेली नव्हती. मी नोकरी करावी अशी वडिलाची इच्छाही नव्हती. एकादा स्वतंत्र धंदा करण्याची हिंमत माझ्या अंगांत नव्हती म्हणूनच माझे दिवस आळसात जात होते."

"पाठीमागें कसली काळजी नव्हती. विवंचना नव्हत्या. खायचं, प्यायचं नि मनमानेल तसं भटकायचं हेंच माझं आयुष्य होतं. पण त्या जीवनक्रमात मन गुंगत नव्हतं कसली तरी टोंचणीं मनाला लागत होती दिवस फुकट दवडले जात होते त्यामुळें मी असमाधानी होत चाललों."

"माझा स्वभाव चिरचिऱ्या होत चालला. क्षुल्लक कारणावरून मी नोकराना अद्वातद्वा बोलूं लागलों, कोणत्याही गोष्टींत माझं मन रमेनासं झालं. मी जीवाला अगदीं वैतागून गेलों होतों"

"माझ्या वडिलांचे एक स्नेही पनवेलला राहात असत. त्याचा नि आमचा फार जुना घरोबा बडोद्याला ते आमच्या शेजारींच रहात असत. पण सेवानिवृत्त झाल्यापासून त्यांनीं बडोदं सोडलं, नि ते पनवेलंला स्थाईक झाले कृष्णाळ्या तळ्या-वाजवळ त्याचा एक टूमदार बगला होता. दोन चार वेळेला मी त्यांच्याकडे गेलों होतों त्यांचा तो बंगला, नि भोंवतालची आमराई मला फार आवडली होती."

"मला एकदम त्याची आठवण झाली मी पनवेलला जाण्याचं निश्चित केलं. नि त्याप्रमाणें त्यांना पत्र टाकलं."

"तीस सालच्या चळवळीचा तो काळ होता. पनवेलसारखं छोटसं शहरदेखील त्या चळवळीनं हादरून गेलं होतं. कांहीं दिवसांपूर्वीच पनवेलपासून बारा तेरा मैल दूर असणाऱ्या चिरनेर नांवाच्या खेड्यांत, जंगल सत्याग्रहानिमित्त गोळीबार झाला होता. पनवेलचे मामलेदारही त्या गोळींबारात ठार झाले होते; इतका स्वैर गोळीबार पोलिसानी केला होता. त्या गोळीबाराची नि सत्याग्रहाची वर्णनं ठिकठिकाणीं ऐकाव-यास मिळत होती. वर्तमानपत्रांत या हकीगती मी पूर्वीच वाचल्या होत्या."

"पण त्या अप्रसिद्ध खेड्याला आतां क्षेत्राचं स्वरूप आलं होतं. चिरनेर गांवाजवळच 'अक्कादेवीचा डोंगर' या नांवाचा एक छोटासा डोंगर होता. याच डोंगरांत गोळीबार झाला होता. आज त्या ठिकाणाला राष्ट्रीय महत्त्व प्राप्त झालं होतं.

"मी तें स्थान पाहून आलों. मुंबईतल्या मोठ मोठ्या मिरवणूकी नि लाठीमार मी पाहिलें होते. पण माझ्या मनावर कशाचाही परिणाम झालेला नव्हता. मी अजूनही स्थितप्रज्ञ होतो. पोलिसांच्या निर्दय छळाच्या रोमांचकारी कथा मी ऐकल्या होत्या पण तिकडे लक्ष पुरवण्याची माझी तयारी नव्हती. उलट मी त्यानाच मूर्खांत काढीत असे. हे लोक मरायला जातातच कशाला ? अशा मिरवणूका काढून का स्वतंत्र होतां येतं ? मूर्ख कोठले !"

कांहीं प्रसंग दिसायला अगदीं क्षुल्लक दिसतात पण पुष्कळदा ते अत्यंत क्रांतिकारक ठरतात. त्या क्षुल्लक प्रसंगामुळेंच आपल्या आयुष्याला एकदम निराळं वळण मिळतं व्यक्तिमात्राच्या आयुष्यात असे प्रसंग पुष्कळदां येतात. अशाच एका क्षुल्लक प्रसंगामुळें, जीवनाकडे पाहण्याच्या माझ्या दृष्टिकोनांत फरक पडला जे जीवन मला रूक्ष नि असाह्य झालं होतं, तेंच जीवन मला रसपूर्ण वाटूं लागलं"

"पनवेलला मी ज्यांच्याकडें रहात असे, त्यांना आम्हीं अप्पासाहेब असं म्हणत असूं अप्पासाहबाचें एक स्नेही नेहमी त्याच्याकडे येत नानासाहेब पनवेल मधले एक नावाजलेले वकील होते. त्यांचा स्वभाव अत्यंत निर्गवी नि मनमिळावू होता. लहान मुलांची त्याना फार आवड. एकादं रडणारं मूल जर त्याना दिसलं तर ते पटकन त्याला उचलून घेत. त्याला खारीक बदाम असं कांहीं तरी देत. मूल मग कुणाच कां असेना, त्यांना प्रियच. त्यांच्याजवळ जातीभेद नव्हता. धर्मभेद नव्हता."

"माझी नि नानासाहेबांची ओळख, अप्पांनींच करून दिली होती. नानासाहेबांना, जवळपासचं असं नात्याचं कोणीच नव्हतं. ते एकटेच होते. पण त्यांचं घर नेहमींच गजबजलेलें असायचं. गोरगरीब विद्यार्थी, माधुकरी मागून विद्यार्जन करणारे गरीब पण होतकरू विद्यार्थी, यांना नानासाहेब म्हणजे एक मोठी मदत होती. नानासाहेबांचं घर म्हणजे एक संस्थाच होती,"

"पण या खेपेला मला नानासाहेब दिसले नाहींत. आज येतील उद्यां

येतील, असं करीत चार पांच दिवस उलटले तरी नानासाहेब आलेच नाहीं माझी कल्पना, ते कुठं बाहेर गांवीं गेले असतील. म्हणून मी अण्णाना म्हटल, " अण्णा, नानासाहेब, कुठं बाहेरगांवीं गेलेत वाटतं ! "

" नाहीं रे बाबा, पण ते मोकळे नाहींत "

" म्हणजे ! "

" या चिरनेर-गोळीबार प्रकरणांत त्यांनाही गोंवलं आहे. "

" या बातमीनं मला धक्काच बसला. "

" दुसऱ्याच दिवसाची गोष्ट. मी टपाल नाक्यावर उभा होतो. इतक्यांत चार पोलिसांच्या पहाऱ्यांत नानासाहेब चालत जात असलेले मला दिसले त्यांचं अंग धूळीनं भरलेलं होतं. एकाद्या सामान्य कैद्याप्रमाणें हाताला काढण्या होत्या त्याच्या ते थकलेले दिसत होते. चिरनेर ते पनवेल हा १३–१४ मैलांचा प्रवास बहुधा पायींच करावा लागला होता त्यांना. "

" त्यांची माझी नजरानजर झाली. माझी मान शरमेनं खालीं गेली. पण त्यांनीं मला हाक मारून ते म्हणाले, " अण्णाना जेवणाची व्यवस्था करायला सांग हं " बस्स येव्हढंच; नि ते पुढं चालूं लागले. त्यांच्या चेहरा नेहमींसारखाच शात होता. त्रासाचं, दु.खाचं, मानखंडनेचं येव्हढंसुद्धा चिन्ह त्या चेहऱ्यावर नव्हतं विष पचविणाऱ्या शंकरासारखे त्यावेळीं मला ते भासले. "

" नानासाहेब निघून गेले. तो प्रसंग माझ्या डोळ्यासमोरून हालेचना. या यातना हा मनस्ताप ते कां सोसतात ? कुणासाठीं हें येव्हढं दिव्य ते आज करावयास सिद्ध झाले आहेत ? त्याना काय जरूरी होती ? हे नि असले प्रश्न मला भंडावून सोडूं लागले. "

" खरंच कुणासाठीं ते हें असल विष पचवित होते ? देशासाठीं ! देश म्हणजे जमिनीचा तुकडा नव्हे. देश म्हणजे त्यांत राहणारे आलेच कीं. म्हणजे मीही आलोंच कीं त्यांत. तुमच्या माझ्यासाठीं ते देहदंड सोशीत होते. "

" जीवनाचा खरा अर्थ त्या दिवशीं कळला मला. दुसऱ्यासाठीं जगणं याचंच नांव जीवन. शेजाऱ्यावर प्रेम करा असं ख्रिस्त म्हणतो तें [illegible] जीवन हें स्वतः करतां नसत. तें दुसऱ्याकरतां असतं. "

" त्या क्षणापासून मला लाभलेलं समाधान अजूनही मला लाभत आहे. ती रुखरुख, ती अपुरेपणाची जाणीव, तो कंटाळवाणा एकलेपणा नि तें जीवघेणं असमाधान माझ्यापासून पार दूर निघून गेली आहेत.

" सुबोध, तुम्हांला मी हेंच सांगतो कीं तुम्हीं दुसऱ्यासाठीं जगायला सुरवात करा आज जे औदासीन्य तुमच्या जीवनांत आलेलं आहे, ते त्याचमुळें नाहीसं होईल. तुम्हीं आत्मनिष्ठ आहांत. ही आत्मनिष्ठेची बंधनं तोडून, जरा बाहेर पडा जग म्हणजे एक सुंदर उद्यान आहे, असं तुम्हांला वाटल्यावाचून राहणार नाहीं "

" या खेड्यात राहण्याचा तुमचा निश्चय आहे. इथं राहूनही तुम्हीं बरच काय करूं शकाल. राजकारणात तुम्हांला गति नाहीं. ठीक आहे. नका पडूं राजकारणांत खेडी हा हिंदुस्थानचा प्राण आहे. असं महात्माजी म्हणतात. आज ही खेडीं निष्प्राण झाली आहेत त्या निष्प्राण खेड्यांत नवजीवन ओतण्याचं बिकट कार्य अजून तसच पडलेलं आहे. खेडीं पुष्कळ आहेत. पण निष्ठावंत कार्यकर्त्यांचा अभाव आहे. सात लाखातलं एक जरी खेडं तुम्हीं कार्यक्षम करून दाखविलं, तरी देखील फारच मोठं देशकार्य होईल "

" निरक्षरता हे रोगाचं मूळ आहे या मूळावर घाव घातला पाहिजे. सारे शेतकरी साक्षर झाले पाहिजेत तुम्हीं त्याना साक्षर बनवूं शकाल. गोधनाचं महत्त्व त्यांना पटवूं शकाल, खादी नि चरखा याचा प्रसार करूं शकाल किती तरी कार्य तुम्हांला करता येईल. इच्छा पाहिजे फक्त. "

" सुबोध, येत्या नाताळांत, कार्यकर्त्यांकरतां एक वर्ग उघडण्याचा तालुका कॉंग्रेसचा विचार आहे. तुम्हीं या वर्गांत सामील व्हा. म्हणजे तुम्हांला जरूर त्या सूचना नि शिक्षण तिथं मिळेल. नि पुढे माझ्याकडून होईल ती मदत नि मार्गदर्शन मी करीनच. "

मनोहरचं सारं बोलणं मी लक्षपूर्वक ऐकत होतों त्याचा शब्द न् शब्द मला पटत होता.

एका नव्या विश्वाचं दर्शन ते मला घडवित होते. त्या नव्या विश्वांत, माझ्यांतल्या साऱ्या उणीवा, माझा एकलेपणा हीं नामशेष झाली होती. माझा तो नवा अवतार मलाच चकीत करणारा होता.

मनोहर स्तब्धच होते. काय बालावं हें मला सुचत नव्हतं. मी त्याचें शब्द एकाद्या भाविक श्रोत्याप्रमाणें अंतःकरणात टिपून घेत होतो

पण ही स्तब्धता बोंचक नव्हती. ही स्तब्धता मला भयाण वाटत नव्हती. मनोहराचं तें एकच वाक्य माझ्या कानांवर सारखं आदळत होतं. " दुसऱ्याकरतां जगणं याचंच नाव जीवन. "

आतांपर्यंत मी जगत होतों तों स्वतःसाठीं त्या जीवनात 'मी' चा विसर मला पडला नव्हता, म्हणून तृप्तीचं समाधान मला कधींच लाभलं नाहीं

पांखरांच्या किलबिलाटानं मी भानावर आलों उगवत्या सूर्याचं स्वागत करण्यासाठीं त्याची गडबड उडाली होती. पूर्व दिशा उजळली गेली होती.

" चला मनोहर, गावात अण्णा वाट पहात असतील माझी. आपल्याला इथंच उजाडलं. " मी उठत म्हणालों.

"अरेच्या खरंच. रात्र कशी गेली हें समजलंच नाहीं. पण या उगवत्या सूर्यानं आम्हाला आज एक नवा कार्यकर्ता मिळवून दिला आहे. खरं ना सुबोध ? " हसत हंसत मनोहर म्हणाले.

" होय " असं म्हणत मी पूर्वेकडे नजर टाकली. सूर्यान क्षितिजावर नुक्तंच डोकं वर काढलं होतं.

उगवत्या सूर्याच आजच अगदीं पहिल्या प्रथम मी उत्साहानं स्वागत केलं.

संपूर्ण.

# आधिक्षेप

ती मला सोडून गेली आहे. दिसत असूनही तिचं आस्तित्व मला भासमान् होत नाहीं. तिच्या नामोच्चारानं मी आज हरखून जात नाहीं तिच्या श्वासानं माझं शरीर आज रोमांचित होत नाहीं. तिच्या सान्निध्यांत माझं हृदय आतां कारंजा-सारखं थुअी थुअी नर्तन करीत नाहीं हृदयांतलीं ती स्पंदनं आतां विराम पावलीं आहेत.

ती आज माझी राहिली नाहीं. तिचे माझे संबंध आतां कायमचे दुरावले आहेत. पुन्हां अेकत्र येण्याची वेडी आशा, मला प्रलोभनं दाखवूं शकत नाहीं. ही तुटलीक शेवटची आहे, अखेरची आहे

या जन्मांतच जे धिंडवडे निघत आहेत, तें पाहिल्यावर पुढच्या जन्मीं तरी माझं अीप्सित पुरं होईल या फसव्या कल्पनेची मोहिनी, माझ्यावर आपलं मोहजाल पसरूं शकत नाहीं.

माझा आधिक्षेप करून ती निघून गेली. तिच्याबद्दल मला काय वाटतं हें समजून घेण्यापूर्वीच ती मला सोडून गेली आहे. नाहीं, हें जग सोडून ती गेल्ली नाहीं. तिचा असा शेवट झाला असता, तर अेकवेळ तो मला परवडला असता. धाय मोकलून मी माझ्या दुःखाला वाट दिली असती, नि माझा दुःखभार हल्का केला असता. पण मैत्रीचा हा शेवट मला असहनीय वाटतो हें मुक दुःख मला पिचून टाकीत आहे. माझं रक्त शोषण करून मला निष्प्राण, अचेतेन करीत आहे. माझ्या श्रद्धेय स्थानाचा विध्वंस करून ती गेली आहे जीवनाचा सारीपट उधळून ती चाल्ती झाली अितस्ततः विखुरलेल्या सोंगट्या-उध्वस्त जीवनाचे ते अवशेष-मला आज रक्तबंबाळ करीत आहेत

आज ती दुसऱ्याबरोबर आमोदाप्रमोदात दंग झालेली आहे. तिच्या जीवनात आज मला स्थान राहीलेलं नाही आज मी अडगळींत जमा झालों आहे.

तिचा गोलसर चेहरा, आज दुसरा कोणीतरी आपल्या हळूवार हाताने कुरवाळीत असेल. जो मुखचंद्र स्वहस्तें कुरवाळावा म्हणून मी आसुसलेला होतो, उतावीळ झालों होतो, ज्या वदनकमलाकडे पाहून माझी तहानभूक हरपून जात असे, पौर्णिमेच्या सुखद ज्योत्स्नेची शीतलता, ज्या मुखेन्दुकडे पाहताना मला अनुभवाला येत असे, तें प्रिय मुखकमल, ती पद्ममुखी आज इतिहासजमा झाली आहे.

मुकुल ! तिच्याप्रमाणे तिचं नांवही किती गोड होतं. विठूच्या नामघोषांत तुकाराम जेव्हढा तन्मय होत असे, त्याच तन्मयतेनं मी तिच्या नांवाचा जप करीत असे. पण माझी ही विठाई, पायाखालची वीट माझ्या अंगावर भिरकावून आज अतर्धान पावली आहे.

पूर्ण विकासित कुसुमांपेक्षां, अर्धोन्मिलित कलिकाच जास्त चेतोहर वाटते तिचं उन्मत्त नि अस्फुट तारुण्य मलाही तसंच विलोभनीय वाटत होतं. ती गोरीपान सतेज अंगकांती, कर्दलीगर्भाची आठवण करून देणाऱ्या त्या मांड्या, ते पुष्ट नितंब, ते मांसल बाहू, ते काजळी पद्मलोचन, चंद्रबिंबाशीं स्पर्धा करणाऱ्या पीन पयोधरांची ती अुन्मत्त नि मादक अुभारी—

सरत्या रात्रींतल्या निसटत्या स्वप्नाप्रमाणें, ती स्वप्नसुंदरी माझ्या जीवनांत

आली, नि तशीच निघून गेली. पण त्या अल्पकालांतल्या वास्तव्याचे भग्नावशेष, आज मला व्यथित करीत आहेत बेदिल करीत आहेत

माझ्या या रुक्ष नि अेकाकी जीवनात, योगायोगानें तिचा प्रवेश झाला. काळ्याशार मेघांत चमकणारी क्षणप्रभा, आपल्या दीप्तीन क्षणकालच वसुधेला तेजाळून टाकते. माझं हें रुक्ष नि भकास जीवन तिच्या आगमनानं असंच उजाळून गेल होत. पण तें किती अल्पकाल! त्या झगझगाटानंतर आता हा भीषण अधःकार अधिकच भयान वाटूं लागला आहे अंधाराची संवय मोडली गेली, नि चमकणारी तेजस्विनी अंतर्धान पावली. काठी हरवलेल्या आधळ्या मुशाफरासारखा, मी स्वत.भोंवतींच गरगर फिरत आहे

मुकुल! काय झालं हे! माझं जीवन असं बरबाद करायचं होतं, म्हणून का तू माझ्या जीवनांत प्रवेश केला होतास?

माझ्या अश्रद्ध जीवनात, श्रद्धेचीं ज्योत तिनच पेटविली होती. प्रीतीची निरांजन तिनंच तेवत ठेविली होती. जीवनातलं संगीत तिनं अैकविलं होतं मला. तिच्यामुळें माझी जीवनावरील आसक्ती बळावली होती. अेक नवं विश्व तिनं मला दाखविलं होतं. पण माझं मार्गदर्शक होकायंत्र आज हरपल आहे, नि वादळी दर्यांत माझी ही चिमुकली नौका हेलकावे खात आहे.

फुलाभोंवतीं पिंगा घालणाऱ्या मधुपासारखं, माझ मन अजूनही तिच्याभोवतींच फिरत आहे. आज तिचा विचार करणं हें पाप आहे पण माझं मन माझ्या काबूंत राखणं शक्य होत नाहीं पाप! पापच असेल त्याचा उत्तरदायित्व मुकुलवर आहे. तीच आहे याला जबाबदार. का यावं तिनं माझ्या जीवनांत!

ती सकाळ आजही मला आठवते. दीड वर्षांपूर्वीची ती सकाळ. उन्हं अंगावर आली होती, तरी मी लोळतच होतों. 'चहा झालाय' अशी मंजूळ आवाजांत ललकारी मारणारं, माझ्याकडे कोणीच नव्हत. बांगड्याचा किण्किण् आवाज करून माझी झोंप चाळविणारं माझ्या खोलींत कोणीच नव्हतं. ओठांचा चंबू करून, हळूवारपणें, माझ्या ओंठाना स्पर्श करणारं—हं. कोणीच नव्हतं असं. मी अेकटा होतो; अेकाकी होतो. पण असुखी नव्हतों. त्या अेकलेपणाची मला संवय झाली होती.

लवकर उठण्याची निकड आज माझ्यामागें नव्हती. म्हणूनच मी लोळत

होतों. पण कुणीतरी दाराची कडी वाजविली, म्हणून आळसत कां होईना, मला उठणं भाग पडल, दार उघडलं नि मी तसाच पुतळयासारखा तटस्थ उभा राहिलों.

आजही तें दृश्य माझ्या डोळ्यांसमोर तरंगतं.

माझी खोली पूर्वाभिमुख होती सूर्याचं कोवळं ऊन अंगणात पडलेलं होतं. माझ्या कुंडींत गुलाबाची अेक अर्धोन्मिलित कळी, कोंवळ्या सूर्यप्रकाशांत आनंदानं डोलत होती, नि पायरीवर तशीच अेक सुकुमार कलिका उभी होती.

" शेखर कुलकर्णी अिथंच राहतात का ? "

तिच्या या प्रश्नानं मी एकदम भानावर आलों.

" होय, या ना आत " असं म्हणत मी आत आलों.

माझी खोली म्हणजे ब्रह्मचाऱ्याच्या खोलीचा एक आदर्श नमुना होता. टेबल, पुस्तकांनीं भरून गेलं होतं. खुर्चीवर मासिकं नि वर्तमानपत्रं यांची रास पडलेली होती. मळलेल्या कपड्याची तोरणं ठिकठिकाणीं लोंबत होती. सिगारेटची थोटकं नि जळक्या काड्या यानीं जमीन दिसेनाशीं झाली होती. आधल्या रात्रीं खाल्लेल्या केळयाची सालटी खोलीभर विखरून गेलीं होतीं.

या देखाव्याची मला संवय होती त्यात काहीं वावगं आहे असं मला कधींच वाटलं नाहीं. पण आज मला माझ्या गबाळेपणाची खंत वाटूं लागली. मी शरमलों,

कशीबशी एक खुर्ची रिकामी करीत मी म्हटलं, " बसा ना, क्षमा करा हं. कोणी येईल, अशी मला कल्पना नव्हती. "

पण त्यावर कांहीं न बोलतां तिनें माझ्या हातीं एक चिठ्ठी दिली. माझ्या एका मित्राची ती चिठ्ठी होती. चिठ्ठी वांचून ती टेबलावर टाकीत मी म्हणालों, " ठीक आहे. आपण थोडा चहा घेऊं नि मग बोलूं सावकाश. चालेल ना ? "

तिनें हंसून समति दिली. मासिकाचा एक अंक तिच्या हातीं देऊन मी चहाच्या तयारीला लागलों.

मुकुलची नी माझी ओळख ही अशी झाली.

एका धान्य दुकानाचा मी व्यवस्थापक होतो. तिथं एक जागा रिकामी झाली होती; आणि ती जागा भरणं हें सर्वस्वी माझ्या हातीं होतं. मी माझ्या मित्राला

तसं बोललों होतों; आणि म्हणूनच त्यानें आपल्या अेका लांबच्या बहिणीला चिठ्ठी देऊन माझ्याकडे पाठविलं होतं. ती जागा मुकुललाच मिळाली.

मुकुलच्या सौंदर्याप्रमाणें तिचा सहवासही उत्तेजक होता. आम्हीं अेके ठिकाणीं, अेकाच टेबलावर काम करीत होतों. आमचं जाणं, येणं नि चहा फराळही अेकत्रच होऊं लागली. तिच्या स्वभावांतल्या विविध छटा, निकट सहवासामुळें माझ्या दृष्टीस पडूं लागल्या. आणि त्याचमुळें मी मुकुलकडे आकर्षिला गेलों.

परिचयाच्या सीमारेखा केव्हांच मागं पडल्या होत्या. त्या ओलांडून आम्हीं पुढं चाललों होतों. मीनकेतनाच्या राज्यांत माझी पाउलं आतां स्थिरावलीं होती.

हे कसं नि केव्हां झालं हें मला कळलंच नाहीं. मी पुढेंच चाललों होतों. किती अतर मागं टाकलं याचं भान पुढें जाण्याच्या उत्साहांत मला राहिल नाहीं. पण ज्या क्षणीं मी मागें वळून पाहिलं त्यावेळीं माझी छाती दबकून गेली. फार पुढें गेलों होतों मी. इथून एकाकी परतणं मला आतां शक्य नव्हतं. पण मी एकटाच राहिलों होतों.

सुटीच्या दिवशीं ती माझ्याकडे येत असे. ती यावयास लागल्यापासून माझ्या खोलीचा नूर एकदम पालटून गेला. वस्तू नीटनेटक्या ठेवल्या जाऊं लागल्या. निकामीं मासिकं नि वर्तमानपत्रं याचे गठ्ठे बांधले गेले, पुस्तकं कपाटांत रचिलीं गेलीं.

मी जगत होतों. पण कसं जगायचं हें मला माहित नव्हतं. मुकुलनं मला हें शिकविलं. माझ्या ऐदी नि अव्यवस्थित कारभाराला तिनं वळण लावलं.

आपला मोर्चा नंतर तिनं माझ्यावर वळविला. माझ्या कपड्यांतला गबाळे-पणा नाहींसा होऊं लागला. विजारीवर इस्त्री फिरूं लागली. बूट चमकूं लागले दाढी दररोज घोटली जाऊं लागली. पोमेड नि फणीची आवश्यकता भासूं लागली; नि अॅशट्रेमध्यें पडणाऱ्या सिगारेटच्या थोटकांची संख्या झपाट्यानं कमी होऊं लागली.

मुकुलच्या व्यक्तित्वानं मी भारावून गेलों होतों. माझं सारं जीवन तिनं व्यापून टाकलं होतं. तिच्याशिवाय अितर गोष्टींचा विचार माझ्या डोक्यांतच येत नसे. मुकुलला आवडेल कां तिला काय वाटेल, ती कशी खुदकन् हंसेल, हे नि

असलच प्रश्न मनापुढें रेंगाळत. ती समोर नसली तर मला काम सुचत नसे. एकादं दिवस जर ती कामावर आली नाहीं, तर त्या दिवशीं काम करणं फार बिकट जाई मला.

पण तिला माझ्याबद्दल काय वाटतं हें मला माहित नव्हतं मी तिला तसं कधींच विचारलं नाहीं. माझ्याशीं ती अत्यंत खेळीमेळीनें वागे, मोकळेपणानें बोले, नि स्वच्छंदपणें माझ्याबरोबर फिरत हिंडत असे. दहाव्या शोला माझ्याबरोबर यावयास ती कधीं कचरली नाहीं. किंवा पौर्णिमेच्या रात्रीं समुद्रावर दोन दोन वाजेपर्यंत गप्पा मारण्याला कधीं तिनें नकार दिला नाहीं.

मी ज्या भावनेनं तिच्याकडे पाहतो, त्याच भावनेनं तीही माझ्याकडे पहात असेल कां, अशा शका कधीमधीं माझ्या मनाला चाटून जाअी, पण तिच्या त्या शात चेहऱ्याकडे पाहिलं, तिचं तें मनमोकळं हास्य अैकलं, की मला माझ्या या क्षूद्र शंकेची शरम वाटे. छे. असं होणंच शक्य नाहीं अितका मोकळेपणा, अितकी आपुलकी तिलाही तसंच कांहींतरी वाटत असल्याशिवाय येणं शक्य नाहीं. मला ठेंच लागली तर ती गोरीमोरी होत असे. दु:ख माझ्या मनांत असे. तर वेदन तिच्या मुखमंडलावर प्रगटत असत

हें असे असतांना, ती दुष्ट शंका माझ्या मनांत कां येई हें सांगणं कठीण होतं 'अतिस्नेहा पापशंकी' असं काहीसं म्हटलं आहे, त्यांतला तर हा प्रकार नसेल ना?

दिवस कसे पांखरासारखे जात होते. पावसाळा गेला. बिनसाखरेची दिवाळी आली नि गेली. मार्गशीर्ष गुलाबी थंडीला बरोबर घेऊनच आला होता. मुकुलनं विणलेला लोंकरी स्वेटर अंगात चढवितांना मी आनंदान पुलकीत होत असे.

एक गुलाबी पत्रिका नि नोकरीचं त्यागपत्र माझ्या हातीं देऊन ती निघून गेली जितक्या अनपेक्षितपणें ती माझ्या जीवनांत आली, तेवढ्याच अनपेक्षितपणें ती निघून गेली.

पण ती गेली नि माझं जीवन काळवंडून गेलं. ज्योत विझून गेली, नि हातांत फक्त काजळी राहिली.

मुकुल ! ती अचानक् माझ्या जीवनांत आली. माझ्या जीवनांला अंधार, तिच्या दीप्तीनं तेजाळून गेला; पण ती गेली, नि काळवंडलेला तो अंधःकार अधिकच भयाणतेनं आज मला ग्रासूं पहात आहे. मुकुल ! मुकुल ! !

---

# उल्का—

पावसाला अशी अचानक सुरुवात होईल, याची तिला कल्पना नव्हती. कुमारच्या खोलींतून ती बाहेर पडली, तेव्हां आकाश अगदीं निरभ्र होतं. जाताना ती कुमारला म्हणालीसुद्धां होती, ' चादणं कसं अगदीं शुभ्र पडलंय, कुमार. शिवाजी पार्कच्या हिरवळीवर तुमच्याबरोबर गप्पा मारीत बसण्याचा मोह मला आवरणं कठीण जातंय, पण आता गेलंच पाहिजे मला फार उशीर झालाय '

' आणि मलाही फार काम आहे म्हणा. अजून सात आठ तरी कथा लिहून पुऱ्या करायच्या आहेत नि त्या पण एका आठवड्यांत झाल्याच पाहिजेत. ' आपलं लिहिण्याचं पॅड पुढे ओढीत कुमारनें तिला सांगितलें

लिहिण्याच्या तंद्रींत असतांना, कुमारला फिरण्याकरतां बाहेर काढणं सुलभ नव्हतं, हें ती जाणून होती आणि इच्छा असली तरी तिलाही आतां जास्त वेळ बाहेर राहणं शक्य नव्हतं. म्हणूनच कांहींही उत्तर न देतां, ती बाहेर पडली.

शिवाजी पार्कपासून तिची चाळ फार तर पंधरा मिनिटांच्या अंतरावर होती. इतक्या जवळ जाण्यांकरतां, बसची वाट पहात अर्धा तास खोळंबत उभं राहण्यापेक्षां, सरळ चालत जाणं, जास्त चांगलं, अशा विचारानें तिनं रस्ता तुडविण्यास सुरवातही केली.

पण सिटी लाईटजवळ तिला पावसानं गांठलं. नि एकादा आसरा गाठीपर्यंत ती भिजून चिंब झाली. आतां निवारा गांठण्यांतही अर्थ नव्हता. एवीतेंवी ती भिजलीच होती म्हणून पावसाची पर्वा न करतां ती चालूं लागली.

चाळींतल्या आपल्या खोलींत ती शिरली, तेव्हां साडेदहा वाजून गेले होते. फक्त तिच्याच खोलींत दिवा तेवत होता. मजल्यावरील इतर खोल्यांत सामसूम झाली होती.

पानाचा डबा पुढें ठेऊन, तिची आई भिंतीला टेकून बसली होती. अभ्या-साची पुस्तकं बाजूला ठेवून, तिची धाकटी बहीण, बिछान्यावर उपडी झोंपून, एक कादबरी वांचण्यांत दंग झाली होती, नि धाकटा भाऊ खिडकीजवळ एका आरामखुर्चीवर पडून, शद्बकोडं सोडविण्यांत मग्न झाला होता.

ती सरळ आंत शिरली. ती भिजून चिंब झाली होती. तिचं पातळ तिच्या अंगाला घट्ट चिकटून गेलं होतं. तिला अशी पाहातांच, तिचा धाकटा भाऊ विजय म्हणाला, ' आई, आपली वसंतसेना आली हं. '

' चारुदत्त खाली उभा असेलच. बघ रे विजू दिसतोय कां ? ' धाकट्या-लीलानं भावाला साथ दिली.

' कुठं ग इतका वेळ होतीस ! ' तिच्या आईनं विचारलें

' मैत्रेणीकडे असेल ' विजूनं उपरोधिक उत्तर दिलें.

पण तिनं कशाकडेही लक्ष दिलं नाहीं. या असल्या स्वागताची तिला आतां सवय झाली होती. त्यांची ही हेटाळणी तिला समजत होती. पण आतां हें सारं तिच्या आगवळणी पडलं होतं.

प्रथम प्रथम या हेटाळणीची धार तिला बोंचत होती. त्यावेळीं तिनं कळ-वळून प्रतिकारही केला होता. पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. रोज रोज त्याच गोष्टी ऐकून तिच्या भावना मद्दिरून गेल्या होत्या.

चाळींतले इतर लोक काय बोलतात, याची तिनं कधींच पर्वा केली नव्हती. हे तोंडपुजे लोक, आज एक बोलतील, नि उद्यां त्यांना खूष करणारं कांहीं केलं, तर ताबडतोब आपली भाषा बदलतील. तिला हें माहित होतं. म्हणूनच त्यांच्या कुजबुजीकडे तिनं दुर्लक्ष केलं होतं.

पण आपल्याच भावंडांनीं आपल्या विरुद्ध शस्त्र कां उचलावं, याचा अर्थ-बोध तिला होत नव्हता. त्यांच्या साऱ्या चैनी तिच्या जीवावर चालत. आज रेडिओ-इंजिनिअरींग, तर उद्या सिने-फोटोग्राफी असं दररोज आपले शिक्षण-

क्रम बदलणारा विजू तिच्याच पैशावर हे थेर करीत होता; आणि कॉलेजच्या नांवावर मित्र-मैत्रिणीचे तांडे गोळा करून गांवभर हुंदडणारी लीला, तिच्याच पैशावर चरत होती. तिला हें सर्व माहित होतं पण तिनें एका शद्बानं कधीं त्यांना दुखविलं नाहीं या अजाण पोराना आवरण्याऐवजीं, आपली आई त्यांना आंतून फूस देत होती, ही गोष्ट तिच्या मनाला जास्त लागत होती.

वास्तविक, तिची आई आजपर्यंत शब्दाशब्दाला तिचं कौतुक करीत असे. तिची भावंडंही तिचा मान ठेवीत. वडिलांच्या मृत्युमुळें उध्वस्त झालेल्या संसाराची धुरा तिनं आपल्या खाद्यावर घेतली; नि जिवापाड मेहनत करून ती आपलं कर्तव्य चोखपणें करीत होती. आपलं कर्तव्य अजूनही तिनं डावललं नव्हतं.

पण तिची कुमारशीं ओळख झाल्यापासून घरांत एक तऱ्हेचं तेढीचं वातावरण निर्माण होऊं लागलं होतं. जी तुटलींक निर्माण होत होती, तिचं स्वरूप सुरवातीला तिच्या ध्यानात आलेंच नाहीं. पण आज त्या तुटलकीची भयानकता तिला अस्वस्थ करीत होती.

तिच्या आयुष्याला आज जो निराळेपणा प्राप्त झाला होता, तो केवळ कुमारमुळेंच. किंबहुना कुमारमुळें तिला आपल्या विस्मृत सुखाची आठवण झाली नि आज कोमलतेचे, आत्मियतेचे सारे बंध, त्या सुखाच्या लालसेकरतां, ती तोडावयास तयार झाली होती.

कुमारशीं ओळख होण्यापूर्वींचा तिचा आयुष्यक्रम अगदींच एकवळणीं होता. कचेरींत जायचं नि संध्याकाळीं तडक घरीं यायचं. भावंडांची नि आईची देखभाल करायची हंसत, खेळत खायचं नि रिकाम्या वेळांत पुस्तकं वाचायची. वाचण्याचं तर तिला वेडच होतं. सुटीचा दिवस मैत्रिणींच्या घोळक्यांत, सिनेमा पाहत किंवा चकाट्या पिटण्यांत ती घालवीत असे.

तिच्या आजच्या आयुष्यक्रमांत तसा विशेष फरक पडलेला नव्हता. पण आज ती जें करते तें सारं कुमारच्या सांनिध्यांत. तिच्या मैत्रिणी मागें पडल्या. कुमारच्या सारखं जवळ जवळ घोटाळत रहावं असं तीव्रतेनं तिला वाटूं लागलं, निरानिराळया सबबी काढून, ती त्याच्या संगतींत राहण्याचा बुद्धिपुरस्सर प्रयत्न करीत होती. कुमारच्या व्यक्तित्त्वानं ती दिपून गेली होती.

कुमारचं प्रसिद्ध झालेलं सारं वाङ्मय तिनं वाचलं होतं. कुमारच्या लिखाणांतला वैचारिक उद्दामपणा तिला फार आवडत असे. या लेखकाची गांठ घ्यावी असा विचार तिच्या डोक्यांत कधींमधीं तरळत जाई. पण तिनं त्यावर फारसा विचार कधींच केला नाहीं.

पण तिची नि कुमारची ओळख झाली, ती एका योगायोगानं. ती ज्या बसनं माहिमला येत होती त्याच बसमध्यें तिला तिची एक जुनी मैत्रिण भेटली. एके काळीं सुलभा म्हणजे तिच्या जीवाभावाची मैत्रिण होती. पण वडिलांची बदली झाल्यामुळें सुलभा पुण्यास गेली. त्यानंतर आज आठ वर्षांनी ती तिला पाहत होती.

आपण कुठं आहोंत याचं भान त्या दोघींनाहीं राहिलं नाहीं. एकमेकींना चिमटे घेत, नि 'अग्या, बरीच ग आहेस तूं' 'चल चहाटळ कुठली' अशा वाक्यांचीं मधून मधून देवघेव करीत, त्या दोघीं गप्पात गुंग झाल्या.

सुलभेबरोबर जाणं तिला भागच होतं.

छोट्या मीनेबरोबर खेळण्यात कुमार दंग होता.

'तुम्हीं तर मीनापेक्षाही लहान होत चाललांत.' सुलभा लडिवाळपणें म्हणाली.

'भिऊं नकोस. तुझ्या लेकीबरोबर मीही मोठा होण्याचा प्रयत्न करीन.' त्यानें हंसत हंसत उत्तर दिलं नि एकदम दरवाज्याकडे वळून पाहिलं सुलभेबरोबर तिची एक मैत्रिण आहे, हे कळताच तो उठून आपल्या खुर्चीवर जाऊन बसला

कुमारचा स्वभाव अत्यंत मोकळा होता. त्याच बोलणं लाघवी होतं आणि मधून मधून एकादी सुंदरशी कोटी करून, खसखस पिकवणं हें तर त्याचं वैशिष्ट्य होतं. कुमारच्या सहवासांत दुर्मुखलेला चेहरा करून बसणं अशक्य होतं.

त्याच्या त्या मनमोकळया हास्यानं नि विनोदाच्या आतषबाजीनं ती कुमारकडे आकर्षिली गेली. पहिल्या भेटींतच जो अनुकुल ग्रह तिचा झाला होता तो दिवसेदिवस वृद्धिंगत होत होता.

न कळत ती मोहात गुरफटली गेली; नि ज्यावेळीं तिला हें कळून चुकलं त्यावेळीं त्या बंधनांतून मुक्त होणं तिच्या आवाक्याबाहेरचं झालं होत.

कुमार म्हणजे एक खपुष्प आहे, हें ती जाणून होती. आपल्या मैत्रिणीचा पति एवढाच अडथळा नव्हता. कुमाराचं आपल्या पत्नीवर निरातिशय प्रेम होत. त्याच्या जीवनात सुलभेशिवाय इतराना स्थान नव्हतं.

कुमारचं आजचं यश, म्हणजे सुलभेच्या कर्तृत्वाचा इतिहास होता. कुमार॰ मध्यें ईर्षा उत्पन्न केली तिनंच. त्याच्या सुप्त कर्तृत्वाला चालना दिली तिनंच. कुमारच्या नवनवोन्मेषशालिनी प्रतिभेचा जो दिलचस्प विलास पहावयास सांपडत होता, त्यामार्गे सुलभेची प्रेरकशक्ती होती.

म्हणूनच कुमारला आकर्षून घेणं, हें अत्यंत दुर्घट काम होतं. तिच्या भावनाची, नि खळबळीची कुमारला कल्पना होती पण सुलभेला दुखवणं त्याला शक्य नव्हतं. म्हणूनच तो गप्प होता. जें होईल तें निमूटपणें पाह्यचं असंच त्यानें ठरवून टाकलं होतं.

सुलभेच्या न कळत, कुमारच्या संगतीचा आनंद, जितका चोरता येईल तितका चोरायचा असा तिचा क्रम होता; नि तिच्या व्याकूलतेनें विरघळलेला कुमार तिच्या कटात सामील झाला.

पण हें असं फार काल चालणारं नव्हतं. फोर्टमध्यें ज्या शांत नि एकाकी हॉटेलमध्यें ते नेहमीं भेटत, तिथं याच गोष्टी ती बोलत असत.

सुलभेचा स्वभाव कुमारला माहित होता. ज्याच्याकरता तिनं अक्षरशः जीवाचं रान केलं, त्यानं आपल्याशीं प्रतारणा केली, ही गोष्ट तिला समजली तर ती मानिनी संतापाच्या नि मनःक्षोभाच्या भरात काय करील, याचा भरंवसा नव्हता. सुलभेशिवाय जगायचं ही नुसती कल्पनाच कुमारला मटकन् खालीं बस-विण्यास समर्थ होती.

विकृत स्वरूपांत या गोष्टी सुलभेच्या कानीं पडण्यापूर्वीच काळजी घेणं आवश्यक होतं; नि ही आवश्यकता कुमारनें तिला पटवून दिली होती. कांहीं झालं तरी सुलभा एक स्त्री होती. एका स्त्रीच्या मनोव्यथा दुसरी स्त्री जास्त सुलभ-तेनं जाणूं शकते. म्हणून प्रांजलपणें तिच्या समोर साऱ्या गोष्टी सांगून, तिलाच मार्ग दाखविण्याची गळ घालायची येवढाच मार्ग शिल्लक होता.

कुमारला विसरायचं, ही कल्पना तिला पटत नव्हती; नव्हे आज तें तिला शक्यही नव्हतं.

कुमारला जरी तिच्याबद्दल सहानुभूति वाटत होती, तरी देखील त्याची वागणूक अत्यंत मर्यादशील होती. मर्यादेचं अतिक्रमण त्यानें कधींच केलं नाहीं.

त्याच्या मर्यादातिक्रमाला तिनें विरोध केला नसता. किंबहुना त्यानं असं करावं असं तिला फार फार वाटे. संकोचाचा जो आड पडदा मध्यें येत होता, तो कुमार-नेंच दूर करावा असं तिला वाटे,

आपलं मन आवरण्याचा तिनेंही आटोकाट प्रयत्न केला. कुमारला न भेट-ण्याचा निश्चय, किंवा भेटलाच तर अत्यंत तुटकपणें वागण्याचा निश्चय, पुरता दोन दिवसही टिकत नसे.

तिच्या वागणुकींत जी ही धरसोड वृत्ती दिसत होती, त्यामागें भावनांचा केवढा प्रचंड कल्लोळ आहे, याची कुमारला कल्पना होती पण आपल्या विशिष्ट मर्यादा ओलांडणं त्याला शक्य नव्हत. तिच्याबद्दल कुमारला जें वाटे त्यामध्यें प्रेमापेक्षा भूतदयेचा अंश जास्त होता.

सुलभा तिच्यापेक्षां निःसंशय जास्त सुंदर होती सुलभा बहुश्रुत होती सुलभेचं व्यक्तित्व तिच्यापेक्षा जास्त तेजस्वी होतं पण ती संभाषण कुशल होती. सुलभेच्या व्यक्तित्वाची दीप्ति तिच्याजवळ नव्हती तो प्रखरपणा तिच्यात नव्हता. तिच्या व्यक्तित्वात ज्योत्स्नेच्या शीतलतेच्या प्रसन्न छटा होत्या

ही समस्या कशी सोडवायची हाच तिच्यापुढें प्रश्न होता जगातली सारी प्रलोभनं समोर ठेविली, तरी सुद्धां कुमार सुलभेशीं प्रतारणा करावयास तयार होणार नाहींत ही गोष्ट तिला माहित होती नि सुलभा तिची जीवाभावाची मैत्रिण होती. आईनें दिलेला खाऊ एकमेकींना दिल्याशिवाय त्यांनीं कधीं खाल्ला नव्हता. वडिलांनी दिलेली पेपरमिंटची गोळी, चिमणीच्या दातानं तोडून एकमेकींना भर-विल्याशिवाय त्यांचं कधीं समाधान होत नसे. त्याच सुलभेच्या सुखाच्या संसारांत एक नवा प्रतिस्पर्धी म्हणून शिरायचं, या कल्पनेनं ती शहारून जाई

चारही बाजूनं तिचा कोंडमारा होत होता. आपलं घर पेटलं आहे, याची तिला जाणीव होती. पेटलेल्या वन्हिच्या ज्वाला, तिला चाटून जात. पण अजून घरानं भडका होण्याइतका पेट घेतला नव्हता. एकादुसरी ज्वाला उफाळून वर येई, इतकंच. पण वन्हि धुमसत मात्र होता.

बाहेरून ती शांत दिसत होती. पण तिच्या अंतरांत ज्वालामुखी पेटला होता. त्या आगीनं ती करपून जात होती.

तिची सारी वस्त्रं भिजून चिंब झाली होती दांडीवरचं एक कोरडं पातळ तिनें ओढून घेतलं. भिजलेले केस टॉवेलानं पुसून, ते मोकळेच पाठीवर सोडले. वस्त्रांतर करून ती बाहेरच्या खोलीत आली.

तिची आई नि दोन्ही भावंडं अजून जागीच होती. तिनं खोलीत पाऊल टाकतांच त्यांचे आपसात झालेले नेत्रसंकेत तिच्या दृष्टीतून सुटले नाहीत. पण तिनें तिकडे लक्षच दिलें नाहीं

आपली वळकटी काढून तिनं अंथरुण पसरले.

तिची आई कांही तरी पुटपुटली, पण तिला तें ऐकू आल नाहीं. ती अगदीं मरगळून गेली होती. केव्हा एकदां अंथरुणाला पाठ लावते असं तिला झालं होतं.

'ए नंदू, ऐकूं नाहीं येत तुला ?' विजू एकदम खेंकसला.

ती ताडकन् उठून बसली. मान खालीं घालून तिच्या जवळ नेहमी गोष्टी करणारा विजू, इतक्या उर्मटपणें बोलेल, याची तिला कल्पना नव्हती कुणाची फूस होती त्याला ! आईचीच, त्याशिवाय इतकं बेफामपणें बोलणं त्याला शक्यच नव्हतं. त्याच्या आवाजांतला दर्प नि उद्दामपणा तिला सहन झाला नाहीं.

भरलेल्या दारूच्या कोठारावर ठिणगी पडली. ठिणगीनं आपलं कार्य सुरूं केलं.

'कुणाच्यारे अंगावर ओरडतोस येवढा ? शरम नाहीं वाटत तुला ?' तिनें चवताळून विचारले.

'शरमण्यासारखं तुझ्यासारखं मी काहींच केलं नाहीं अजून, समजलं कां नंदू ! लाज शरम गुंडाळून तूं जो हल्लीं नंगा नाच सुरूं केला आहेस, त्यामुळें मात्र माना खालीं घालण्याचा प्रसंग आमच्यावर नक्कीच आलेला आहे.'

पण विजूच्या या उपरोधिक उत्तरानं, ती अधिकच बेफाम झाली व ताडकन् त्याच्या श्रीमुखात देऊन ती ओरडली, 'चूप, तुला कोणी सांगतल्यात या नसत्या पंचाइती ? बहिणीच्या पैशावर दोन वेळा गिळतांना शरम वाटली पाहिजे तुला.'

'नंदू, कां त्याला उगीच बोलतेस ! तो खोटं सांगतोय ? सारी चाळ आज तेंच बोलून राहिलीय. तुझ्यापायीं आज त्यांना मान खालीं घालून जावं लागलं.' तिची आई साळसुदपणें बोलून गेली.

'चुलींत घाल ती चाळ.' ती बिजलीसारखी कडाडली, 'चाळीच्या नांवावर, तुम्हीं तुमच्या मनांतली किल्मिषं ओकत आहांत. तुम्हीं फूस देता म्हणून त्यांच्या बडबडीला उत्तेजन मिळतं. काय करायचं आहे तुम्हाला चाळीशीं. चाळ तुम्हांला पोसायला येत नाहीं. तुमची थंड पडलेली चूल पेटवण्याकरता, चाळींतला एकही धर्मात्मा पुढें व्हायचा नाहीं. शिताभोंवतीं नाचणारीं ही भूतं, थोडीशी शितं टाकली कीं आपोआप थंड होतील

' तें खरं असलं, तरी तुझं करणं मला वावगं वाटतं, नंदू. त्यांचं लग्न झालेलं आहे. तिची आई शांतपणें बोलत होती.

' होय मला तें माहित आहे. त्यांना एक मुलगी आहे, मुलीवर आणि पत्नीवर त्याचं प्रेम आहे हेंही मला माहित आहे. त्याची पत्नी, माझी जिवलग मैत्रिण आहे, हेंही पण मी जाणून आहे. पण सुटलेला बाण परत फिरवता येत नाहीं आई. कधीं मान वर करून मी जगाकडं पाहिलं नाहीं. पण ज्या वेळीं मी माझी मान उंचावली, नेमकं, त्याचवेळीं कुमारचं दर्शन मला झालं. त्यांच्या व्यक्तित्त्वानं मी मोहून गेलें. पण दुसरीच्या मूर्तीचा अपहार मी करीत होत्ये, याची मला त्या क्षणीं कल्पना आली नाहीं. माझं हृदयदान मातीमोल झालं.

सुलभा माझी मैत्रिण आहे, लहानपणीं एकच पेरू आम्हीं दोघी वाटून खात होतों; एकमेकींना दिल्याशिवाय आमचं पोट भरत नसे. त्याच सुलभेच्या सुखावर निखारा ठेवण्याइतकी मी दुष्ट नाहीं, आई. माझं प्रेम विफल झालं असलं, तरी त्या वैफल्यांत हें एक समाधान आहे, कीं माझी सुलभा सुखांत आहे. त्याच्या सुखानं माझं पोट भरतं.

माझ्या हातून चूक झाली असेल, पण ती चूक आता दुरुस्त होण्याजोगी नाहीं. त्या चुकीचे भोगावे लागणारे परिणाम मलाच भोगले पाहिजेत पण माझ्या पोळलेल्या मनाला, असल्या हेटाळणीनं, जास्त जायबंदी करूं नका. सहा महिन्याचं माझं आयुष्य, सहा दिवसावर आणूं नका. आई, तुझ्या हतभाग्य पोरीची ही पहिली नि शेवटची याचना आहे. आई—'

काळ्याशार मेघांनीं आकाश ढगाळून गेलं होतं. वातावरण कुंद झालं होतं. विजा लवलवत होत्या. कड् कड् कडाड् कानठळ्या बसविणारा आवाज झाला. संतप्त

बिजलीनं त्वेषानं, अंतरिक्षांतून उडी घेतली, धरितीमातेच्या कुशींत शिरून, कसलं गाऱ्हाणं तिला सांगायचं होतं कुणास ठाऊक! पण त्या प्रकाशाच्या झोतानं सारं आसमंत उजळून गेलं. बिजलीच्या दिव्यांची प्रभा काळवंडून गेली.

तड् तड् तड्. पावसाची पुन्हां एक जोरदार सर आली. ह्या पर्जन्यधारांनीं पृथ्वी न्हाऊन निघत होती नि आंत, त्या निःस्तब्ध खोलींत, नंदिनी आपल्या अश्रूंनीं उशी भिजवीत होती.

---

## पुरुष !

फार फार वर्षांपूर्वी घडलेली ही गोष्ट आहे. कदाचित् युगही लोटली असतील इथं, या पृथ्वीवर ती घडली वा आकाशांत जे अनंत ग्रह दिसतात त्यावर घडली, हें सांगणं कठीण आहे. पण ही गोष्ट घडलेली आहे, येव्हढं मात्र खरं

त्या जगाच्या एका कोंपऱ्यांत तीं दोघं रहात असत. त्यापैकीं एक स्त्री होती नि एक पुरुष होता दोघेही तरुण होती. कंदमुळाच्या शोधार्थ भटकतांना त्याची दररोज गांठ पडे; त्याचमुळें त्याचा परिचय वाढत गेला ती दोघं आतां हातात हात घालून फिरूं लागली; नि यांत अनैसर्गिक असं काहीच नव्हतं. अशी घटना आजच्या या जगांतदेखील प्रत्यही घडते; घडूं शकते. दररोज आपल्याबरोबरच स्टेशनवर येणारी नवयौवना, सुरवातीला फणकाऱ्यानं पुढे जाते. नंतर काहीं दिवसांनीं स्मितहास्याच्या सुरकत्या चेहऱ्यावर पडूं लागतात. नंतर करपल्लवीची भाषा सुरूं होते, नि हळूहळूं पण निश्चितपणें त्यांची पाउलं विवाह वेदीकडे पडत असतात. आजच्या जगांतली ही सत्यकथा सर्वांनाच परिचित आहे. निकट परिचयामुळें त्यांतलं नाविन्य नाहीसं झालं आहे येव्हढंच. पण फार फार वर्षांपूर्वी देखील अशा घटना घडूं शकत होत्या, ही गोष्ट निर्विवाद.

पण आजच्या जगासारखं, त्या काळचं जग अश्रद्ध नव्हतं त्या जगांत श्रद्धा होती, देवावर विश्वास ठेवला जात असे, नि देवावरची श्रद्धा, भक्ती वाढीस लागावी असे चमत्कारही त्या काळीं, त्या जगांत घडत.

त्या जगांत, एका निबिड अरण्यांत एक पुरातन शिवलिंग होतं. तें देवालय फार पुरातन होतं. देवालयाच्या भिंती जमिनदोस्त झालेल्या होत्या. चारही बाजूला वृक्षवल्लरींचा एक घनदाट कुंज निर्माण झाला होता तें शिवलिंग अरण्याच्या मध्यभागीं होतं. हें अरण्य इतकं दाट होत, कीं दिवसांसुद्धां सूर्यकिरणाचा त्यात प्रवेश होणं कठीण होतं. वन्य श्वापदांच तें निवासस्थान होतं, नि खालीं पडलेल्या पाल्यापाचोळ्यांतून जीव जीवाणूं स्वैर भटकत.

पण तें शिवलिंग जागृत होतं. भक्ताच्या इच्छा पूर्ण करण्याचं सामर्थ्य त्याचे ठायी होतं पौर्णिमेच्या रात्रीं, स्वतःच्या रक्ताचा अभिषेक, जर त्या शिवलिंगावर केला, तर अशा भक्ताचं इप्सित साध्य होत असे.

ही आख्यायिका त्या स्त्रीला माहित होती.

पुरुषांपेक्षां स्त्रियाच जास्त भाविक असतात. या आख्यायिकेवर तिची श्रद्धा होती. त्याची प्रचिती पहावी असं तिला फार फार वाटे. पण तिच्या सहचराचा या दंतकथेवर विश्वास नव्हता. नेहमीं पुरुष जें करतात, तेंच तो करीत असे. "हा खुळेपणा आहे" हें नेहमचि पालुपद तो तिच्या तोंडावर फेंकीत असे. नि मग गप्प राहण्याशिवाय तिला कांहींच करता येत नसे.

त्यांचं राहण्याचं निश्चित् असं ठिकाण नव्हतंच. दिवसभर भटकल्यानंतर कुंठतरी, एकाद्या झाडाखालीं, नाहींतर एकाद्या निवाऱ्याच्या जागेंत ते पडून राहत. भूमितल हीच त्यांची शय्या होती त्यामुळें कधीं ना कधीं तरी त्या जंगलाच्या बाजूला आपला मुक्काम होईलच, नि त्यावेळीं आपली ही मनीषा तृप्त करूं या आशेवर ती होती.

तिची इच्छा लवकरच फलद्रूप झाली

पौर्णिमेची ती रात्र होती टिपूर चांदण्यांत सृष्टी न्हावून निघत होती. फेंसाळलेल्या लाटा धडका देत धरणीवर कोसळत होत्या

आपला भाला वाळूंत खूपसत तिचा सहचर म्हणाला, "चल, समुद्र आपल्याला बोलवित आहे."

अंगावरची वस्त्रें भिरकावून त्यानें एकदम उडी घेतली. अंगावरचं उत्तरीय दूर करून, तिनं कंचुकीची गांठ सोडली नि त्याच्या मागोमाग तीही पाण्यांत शिरली

दमलाभागलेला तिचा सहचर निवातपणें तिच्या मांडीवर डोकं टेकून झोंपला होता. त्याच्या लांबसडक केंसांतून तिची लांबट नि मृदु बोटं हळुवारपणे फिरत होती. चंद्राच्या प्रकाशात त्याचा चेहरा अत्यंत मोहक नि आकर्षक दिसत होता. हळुवारपणें तिनें त्याच्या कपाळावर ओंठ टेकले. त्याचं मस्तक अलगदपणें खालीं ठेवले. आपल्या खांद्यावरील उत्तरीय त्याच्या अंगावर टाकलें. आपल्या कंचुकीची गाठ नीट करून, तिनें पुन्हां एकवार त्याच्याकडे पाहिलें, नि पाऊल न वाजवितां, तिनें अरण्याचा मार्ग क्रमण्यास सुरवात होती

अरण्यांतील तो रस्ता तिला वाटत होता तेव्हढा सुलभ नव्हता. जाण्याकरतां रस्ता असा नव्हताच मुळीं कांट्याकुट्यांतून, खांचखळग्यांतून नि झाडांझुडूपातून कसातरी मार्ग काढावा लागत होता चंद्रकिरणाचा प्रवेश आंत होंत नव्हता. अजस्त्र वृक्षांच्या काळ्याशार छाया भूतासारख्या तिला भेडसवित होत्या, नाउमेद करीत होत्या पण आपल्या सहचराचा चंद्रबिंबाप्रमाणें मोहक दिसणारा मुखचंद्र तिच्या डोळ्यासमोर येई, नि त्याच्या सुखासाठीं या साऱ्या आपदा, हे कष्ट नि भीति, ती विसरुन ती पुन्हां जोमानं मार्ग अक्रमण्यास सुरवात करी.

ज्यावेळीं ती देवालयाजवळ पोंहोचली, त्यावेळीं मध्यरात्र टळून गेली होती ती अगदीं थकून गेली होती. कांट्याकुट्यांतून मार्ग काढावा लागल्यामुळें, तिचं अंग ठिकठीकाणीं ओरखडलं गेलं होतं. श्वास घेण्यापुरतीच ती एका शिलाखडावर क्षणमात्र बसली. नि नंतर जवळच्या कुंडावर हात पाय धुवून ती त्या पडक्या देवाल्यात शिरली.

चद्रकिरणाचे एक दोन कवडसे त्या शिवलिंगावर पडले होते. गुढगे टेंकून तिनें नमस्कार केला, नि आपली मनीषा पूर्ण करण्याची प्रार्थना केली

पण तिला जबाब मिळाला नाहीं मग तिला एकदम आठवण झाली. रक्त-दान ! रक्ताचा अभिषेक केल्याशिवाय आपली इच्छा पूर्ण होणार नाहीं. तिनें कंचुकीची गांठ सोडली. जवळचा एक धारदार दगड घेऊन, आपल्या उन्नत उरोजाच्या मध्यभागीं, एक जखम केली. तिच्या लालभडक उष्ण रक्ताचा अभिषेक त्या शिवलिंगावर होऊं लागला.

थोड्याच क्षणांत, त्या शिवलिंगातून एक गंभीर आवाज तिला ऐकू आला. ती आणखी विनम्र झाली.

त्या गंभीर आवाजांत तिला एक प्रश्न ऐकू आला.

"वत्सा काय हवं आहे तुला ?"

"प्रभो, माझा एक सहचर आहे. जीवापेक्षा मला जास्त वाटतो. त्याला सुखी करावं असं मला वाटतं" तिनें उत्तर दिलें.

"कशानें तो सुखी होईल ?.'

"प्रभो, तें मला माहीत नाहीं. तें मला सांगतां येत नाही. पण त्याच्या मनासारखं करा. तो जें जें वाछित असेल, तें तें त्याला प्राप्त व्हावो, हीच माझी इच्छा आहे"

" ठीक आहे वत्सा, तुझ्या इच्छेप्रमाणे होईल "

तो आवाज एकदम गुप्त झाला. ती एकदम भानावर आली आपण स्वप्नातर नाहीं ना, या आशंकेनं तिनं स्वत ला चिमटे घेतले छे: स्वप्न नव्हतं तें.

तिचा आनंद दुथडी वाहू लागला. पुन्हा एकवार विनम्र भावाने तिनं शिवलिंगाला नमस्कार केला. कंचुकीला गाठ मारली; नि काट्याकुट्याची, खाच-खळग्याची पर्वा न करता, एकाद्या चपल हरिणीसारखी उड्या मारीत ती परत फिरली.

पण तिच्या सहचराचा पत्ताच नव्हता जीवाची पर्वा न करता, ज्याच्या सुखासाठीं तिनं येव्हढी आटाआटी केली होती तो तिचा सहचर तिला कुठंच दिसेना. ज्या ठिकाणीं त्याला झोपवून ती गेली होती, तिथं फक्त तिचं उत्तरीय पडलेलं होतं.

सहजच तिची नजर समोर गेली. पौर्णिमेच्या त्या धवल ज्योत्स्नेत, एक सुंदर नौका लाटेवर झुलत होती. ती नौका सुटण्याच्या तयारीत होती, नि त्या नौकेंत तिचा सहचर दुसऱ्याच एका रमणीच्या गळयात हात टाकून उभा होता.

त्याला अडविण्याच्या हेतूनं, ती त्वेषानें पाण्यात शिरली. पण लाटेच्या पहिल्याच धडकीनं ती खालीं कोसळली. ती धडपडत उठली. पण ती नौका आता सुटली होती. तिच्या डोळ्यादेखत, तिच्या सहचराला घेऊन जात होती, नि तिला कांहींच करता येत नव्हतं. ज्याच्याकरतां तिनं येव्हढं दिव्य केलं होतं, तो तिचा सहचर, तिलाच सोडून दूर दूर जात होता.

ती अगतिकपणें खालीं बसली.

" वत्सा झालं तुझं समाधान ? " तोच धीर गंभीर आवाज तिला ऐकूं आला. ती पटकन् उठली, नि हात जोडीत म्हणाली, " प्रभो, काय झालं हें ! हें असं व्हावें अशी माझी इच्छा नव्हती. "

" बेटा. तो जें जें वांछिल तें तें या. असं तुझं मागणं होतं. तुला सोडून कुठं तरी दूर दूर जावं असं तुझ्या सहचराच्या मनांत होतं. म्हणून असं घडलं. त्याच्या मनात काय होतं त्याचा तुला पत्ता नव्हता. "

" होय प्रभो, बायकांच्या भोळेपणानं मी वागलें. माझी समजूत होती कीं माझ्यापेक्षां त्याला इतर कांहीं प्रिय असणं शक्यच नाहीं. माझ्या भोळेपणानं माझा नाश झालाय प्रभो. "

वाळूंत डोकं खुपसून ती ओक्साबोक्शी रडत होती. चंद्रकिरण तिचं सांत्वन करण्याचा प्रयत्न करीत होते. सागराच्या लाटा तिच्या पायावर लोळण घेत होत्या.

---

# मृगजळाच्या मागें

गोवरीची उशी घेऊन, ओंडक्याच्या बिछायतीवर त्याचा देह आतां ऐस-पैस पडला होता. गेल्या चार वर्षांत, असं आरामशीर पसरण्याइतकी जागा त्याच्या वाट्यास कधींच आली नव्हती. कुठं तरी नि कसं तरी झोंपायचं येव्हढंच. झोंपण्याचं ठिकाणही निश्चित नव्हतं. कधीं फुटपाथ, तर कधीं आगाशी. मिळेल तिथं झोंपायचं. झोपेशिवाय जगणं अशक्य होतं म्हणून झोंपायचं. अपुरं अन्न नि अर्धवट झोंप ही आमची मिरासदारी .होती.

नानू आमचा म्होरक्या होता. आम्ही चौघेही अनिकेत होतों. एकाच ठिकाणी आम्हीं नोकरी करीत होतों.

तशी आमची पूर्वीची ओळख नव्हती. आम्ही लंगोटीयार नव्हतों. नोकरी-मुळें आम्ही एकत्र आलों आम्हांला राहाण्याला जागा नव्हती, आम्हीं समदुःखी होतो. म्हणून अचूक आम्ही एकत्र आलों.

आम्हीं चौघेही फटिंग होतों. आमच्या मागें कसलेही पाश नव्हते, ही त्यांतल्यात्यांत समाधानाची गोष्ट होती. मुंबईत आमच्या ओळखीचं कोणीच नव्हतं. चार दोन नात्यांचीं माणसं होतीं, पण हॉटेलचा उंबरठा ओलांडून पुढें सरकण्याची संधि, या नातलगांनीं केव्हांच दिली नाहीं. ते ओळख दाखवीत. हॉटेलमधला पावडरचा चहा पाजीत, नि जागेच्या दुर्भिक्षावर एक जळजळीत व्याख्यान आम्हांला ऐकवून निघून जात.

रेशमाच्या किड्याप्रमाणें, ते आपल्याभोंवतीं स्वार्थाचीं बंधनं आवळीत होते. जग स्वार्थी बनत चाललं होतं. आपण, आपलं सुख याभोंवतीं साऱ्यांच्या आशाळभूत नजरा भिरभिरत होत्या. त्या स्वार्थी नजरेला इतरांची दुःख दिसत नव्हतीं. पैसा जगावर स्वामित्व गाजवीत होता. छन् छन् वाजणाऱ्या रुपयाच्या तालावर जीवमात्र नाचत होता. माणुसकीचा विसर पडला होता. माणुसकी मृत्यूपंथाला लागली होती माणुसकी मरत होती.

आम्ही चौघेजण जगत होतों कसं तरी जगण्याचा प्रयत्न करीत होतो. त्या जीवनाला अर्थ नव्हता. त्या जीवनाला आकार नव्हता. रंगरूपविहीन जीवन. कुत्र्याच्या जिण्याहूनही अपमानास्पद जीवन. पण तें जीवन आम्ही जगत होतों. मरायची भीति वाटत होती म्हणून जगत होतों पण नानू खरा वीर ! त्याला मरणाची भीति वाटली नाहीं. मृत्यूला आपण होऊन त्यानं आलिंगन दिलं.

होय, नानूनं आत्महत्त्या केली. जगणं अशक्य झालं म्हणून त्यानं मृत्यूला मिठी मारली. कुठं झोपायचं हा प्रश्न त्याला आता सोडवावा लागणार नाहीं तो प्रश्न त्याच्यापुरता तरी कायमचा सुटलेला आहे.

तसं म्हटलं तर आमचा नानू फार विचारी होता. त्याच्या शांत स्वभावामुळेंच आमची एकजूट अभंग राहिली होती त्याच्या म्हणण्याप्रमाणें साऱ्या गोष्टी पार पाडण्याचा प्रयत्न आम्ही करत असूं.

दिवसाचा बराचसा काल आम्ही कचेरींत काढीत असूं सकाळीं नऊ ते संध्याकाळीं आठ वाजेपर्यंत आमचा मुक्काम कचेरींत असे. निदान खुर्चीवर आरामशीर बसायला तरी मिळे त्यामुळें ! कचेरींत असं बसण्यामुळें आमचा आणखी एक फायदा झाला होता. आमच्या वरिष्ठांचं आमच्याबद्दल एकदम चांगलं मत झालं. त्यामुळें, आम्ही फार कष्टाळू कारकून आहोंत, असा त्यांनीं समज करून घेतला होता. पण अंदरकी बात आम्हांलाच माहित होती. कचेरींतून बाहेर आल्यावर जेवण, सिनेमा नि मग हातपाय पसरण्याकरतां जागेचा शोध, हाच आमचा दिनक्रम होता.

पंचाईत पडे ती रविवार किंवा सुटीच्या दिवशीं. दिवस अगदीं खायला उठत असे. रात्रीं कोठल्यातरी कोपऱ्यांत तरी पडायला मिळे, पण दिवसा काय करायचं !

आजारी पडण्याची सोयच नव्हती. आजाराला विश्रांती हवीच होती. स्वस्थ

पडून राहायला पाहिजे होतं. पण शरीराचे हे असले लाड पुरवणं आम्हांला शक्य नव्हतं. विश्रांतीचे चोचले आम्हांला मानवणारे नव्हते. आम्हीं जिभेचं कोडकौतुक पुरवूं शकत होतों. स्वस्त कीं महाग हा प्रश्न आमच्या नजरेसमोर येतच नसे. पण बिछान्यावर आरामशीर झोंपणं ही गोष्ट आमच्या हातांतली नव्हती मऊ मऊ गादीवर सकाळीं नऊ वाजेपर्यंत लोळत पडण्याचं आमचं स्वप्न अजून स्वप्नच राहिलं होतं दररोज आम्हीं त्या स्वप्नाची उजळणी करत असूं, त्या दिवा स्वप्नात निरनिराळे रंग भरण्यात आमची स्पर्धा लागे. पण आमचं स्वप्न !

तसं म्हटलं तर मुंबईत रिकाम्या जागा अगदींच नव्हत्या असं नाहीं, पण त्या असून नसल्यासारख्याच होत्या त्या आमच्या आवांक्याबाहेरच्या होत्या. पाचशें, हजार रुपये पागडी देण्याची आमची ऐपत नव्हती. पागडीशिवाय जागा मिळणं अशक्यच होतं. आणि तोंपर्यंत आम्हांला असंच वणवण हिंडत राहणं भाग होतं.

पण आमचा नानू फार आशावादी होता. आम्हीं निराशेनं खचून जाऊं नये. म्हणून युक्तीप्रयुक्तीनें तो आम्हांला दररोज मधाचं बोट चाटवीत असे. आज काय माटुंग्याला नवी इमारत बाधण्याचं काम सुरू झालं आहे तिथं जागा मिळेल. आशेनं तिथं धांव घ्यायची ! पागडीवर आदळून परत फिरायचं. उद्यां काय, तर सरकारच्या पंचवार्षिक योजनेचा कोनशिला–समारंभ आहे, चला तिथं. आज नाहीं, निदान पांच वर्षांनीं तरी जागा नक्कीच मिळेल.

आशा ! आशा ! ! आतां या शब्दाची किळस आली होती. त्या शब्दाला अर्थ उरला नव्हता. जीवनांतलं मांगल्य निघून गेलं. पावित्र्याला किंमत राहिली नव्हती. नीति काळ्याबाजारांत गेली होती. बेजबाबदारी वाढत्या प्रमाणांत होती. आम्ही आजची काळजी करीत होतों. उद्यांविषयीं आम्ही बेपर्वा होत चाललों होतों.

आशा करायला जागाच नव्हती. स्वप्नांचे इमले आम्ही उभारीत होतों. पण त्या इमल्यांना पायाच नव्हता ! संसार, लग्न हीं सारीं मृगजळासारखीं वाटत होतीं आम्हांला.

दोष तरी कुणाला द्यायचा ? सरकार आमचं होतं. त्यांच्या अडचणींची आम्हांला अंधुक कां होईना, पण कल्पना होती. त्या आमच्या नव्या सरकारला आम्हींच शिव्या द्यायच्या ?

पैसेवाले कसाब असतात हेंही आम्हांला समजत होतं. अडचणीचा फायदा घ्यायचा हेंच त्यांचं नीतितत्व होतं.

आम्ही अगतिक झालो. जगण्याची सक्ती होती म्हणून जगत होतों. जीव देणं हा गुन्हा ठरत होता म्हणून जगत होतों!

पण नानूनं हा गुन्हा केलाच. आमच्या विचारी नानूला हा अविचार करणं भाग पडलं. मनोभंगाचं दु.ख विसरण्याकरतां त्याला मृत्यूला मिठी मारणं भाग पडलं.

नानू निर्दोषी होता. जागा मिळविण्याकरतां त्यानें अक्षरशः पायांची चाळण केली होती. पण त्याला यश मिळालं नाहीं. नानू मृगजळामागं धांवत होता.

नानूची नि लीला सप्रेची ओळख केव्हा झाली, हें आम्हांला कळलंच नाहीं. आम्हाला जेव्हां ही गोष्ट समजली त्यावेळीं त्यांच्या ओळखीचं स्वरूप बरंच गुंतागुंतीचं झालं होतं. भेटी प्रतिभेटीची देवाण--घेवाण सुरूं झाली होती. चिठ्या-चपाट्यांची अदलाबदल होत होती. पातळ, ब्लाऊज, विकच्छ किं सकच्छ इत्यादि अपरिचित शब्दांची घोडदौड आमच्या कानांवर आदळूं लागली होती.

नानू आम्हांला दुरावला होता. त्यानें पुढारीपणाचं त्यागपत्र दिलं होतं. आतां आम्हीं तिघेच राहिलों होतों तसा तो आमच्यांतच होता. आमच्याबरोबर तो जेवत असे. आमच्याबरोबर तो फुटपाथवर झोंपत असे. पण असं असूनही तो आम्हांला आमच्यांतला वाटत नसे. नानूमध्यें होत असलेला बदल आम्हांला जाणवत होता. नानू बदलत होता.

या बदलाला कारण होती लीला सप्रे. लीला सप्रे तशी मोठी गोड होती. दिसायला चांगली, रंगानं गोरी नि स्वभावानं मिठ्ठास.

नानूनं आमची ओळख करून दिली. लीला सप्रे नानूला अनुरूप आहे, असंच आमचं मत झालं आम्ही तिच्या घरीं दुधाचा चहा पिऊनही आलों. अर्थात् नानू आमच्याबरोबर होताच.

कोणत्याशा रेशनिंग ऑफिसांत ती नोकरीला होती. रेशनिंग ऑफिसमध्यें इतकी चांगली मुलगी असेल यावर आमचा विश्वास बसला नसता पण आम्हीं लीला सप्रेला डोळ्यांनीं पाहिली होती. भांगेंत तुळस उगवते त्यांतलाच हा प्रकार वाटला आम्हांला. रेशनिंग ऑफिस म्हणजे निराकार मुली, असं आमचं लाडक समीकरण होतं. आणि तें अगदींच वारेमाप नव्हतं. पण लीला सप्रे ही एक अपवाद होती झालं.

एक दिवस नानूनं आम्हांला पेढे दिले. लीला सप्रे त्याच्याशीं लग्न करायला तयार झाली होती. तिच्या आई-वडिलांची संमति होती.

पण तिच्या वडिल माणसांची संमती सशर्त होती ! लीला सप्रेच्या त्या अटीला पाठिंबा होता. नवा संसार थाटण्याकरतां, नानूला खोली मिळवणं भाग होतं. खोली मिळाल्याशिवाय लग्न होणं शक्य नव्हतं.

आम्ही कसून कंबरा बांधल्या. चाळीचाळींतून भटकलों कुलाब्यापासून विरार, कर्जतपर्यंत भटकलों. पण पागडीशिवाय जागा दिसतच नव्हती. हुंड्यांशिवाय नानू लग्नाला तयार होता पण खोलीशिवाय लग्न करायला लीला सप्रे तयार नव्हती फुटपाथवर संसार थाटण्याची तिची तयारी नव्हती.

आमची शोधाशोध, आमची पायपिटी निष्फळ ठरली. सहा महिन्यांतले आमचे श्रम वाया गेले

लीला सप्रे व्यवहारी मुलगी होती. रोमियोंकरतां जीव देणारी जुलिया तिच्या दृष्टीनें एक मूर्ख मुलगी होती. पावडर, साड्या, दागिने नि फुलांच्या वेण्या पुरवणारं यंत्र म्हणजे नवरा, अशी नवरा या शब्दाची तिची व्याख्या होती. ती व्यवहारी होती. तिच्या हिशेबीं भावनेला कांहींच किंमत नव्हती. भावनांचं अवडंबर म्हणजे दुबळ्या नि कर्तृत्वहीन जीवांनीं आपलं दौर्बल्य लपविण्याकरतां उपयोगात आणलेली एक ढाल आहे, असं तिला वाटे.

पण नानू फार भावनाप्रधान होता. लीला सप्रेचं आपल्यावर जिवापाड प्रेम आहे असा त्याचा समज होता. सहा महिन्यांत जागा मिळविण्याची तिची अट म्हणजे तिच्या मीलनोत्सुक जीवाची अधिर उत्कंठा आहे, अशी त्याची भावना होती. सहा महिने म्हणजे अगदीं सहाच महिने असा त्याचा अर्थ नाहीं. तर शक्य तितक्या लवकर, असाच त्याचा अर्थ काढायचा.

आपल्या कामगिरीचा रिपोर्ट तो दररोजच लीला सप्रेला देत असे. पण याचा परिणाम तिच्यावर किती झाला, हें समजण्याला मार्ग नव्हता.

तिची सहा महिन्यांची मुदत बोलबोलतां संपून गेली. आम्हीं आमच्या प्रयत्नांची पराकाष्ठा केली. पण बोलूनचालून आम्हीं मृगजळाच्या मार्गे धांवत होतों. तें आमच्या हातीं मिळणं दुरापास्त होतं. पण नानूला खात्री होती कीं

लीला अगदीं कांटेकोर राहणार नाही. आपल्यावर तिचं खरं खुरं प्रेम आहे. त्या निस्सीम प्रेमांत असल्या क्षुल्लक गोष्टी अडथळा आणूं शकणार नाहींत.

पण नानूचा तो एक भ्रम होता. नानूला हवेंत बंगले बांधण्याची संवय होती. लीला सप्रेच्या स्वभावाला तें मानवत नव्हतं. नानूची वाग्दत्त वधू म्हणून अनिश्चित कालपर्यंत राहण्याची तिची तयारी नव्हती. नानू तिला आवडत नव्हता असं नाहीं. पति म्हणून नानूचा स्वीकार करायला ती तयार होती. पण एका गृहहीनाची गृहलक्ष्मी बनण्याला ती नाखूष होती. नानूला खोली केव्हा मिळेल याचा भरंवसा नव्हता. मिळण्यापेक्षां न मिळण्याचा संभव जास्त होता. मुदत वाढवून देखील पुढच्या चार महिन्यांत आपल्याला खोली मिळेलच अशी ग्वाही देणें नानूला शक्य नव्हतं. आणि म्हणून लीला सप्रे मुदत वाढविण्यास नाखूष होती.

हा पेंचप्रसंग सोडविणं आमच्या आवाक्याबाहेरचं होतं

एक दिवशीं, लीला सप्रेची लग्नचिठी आमच्या हातांत पडली. एका 'घरंदाज' तरुणाबरोबर ती लग्न करणार होती.

नानूला धक्काच बसला. आमचा नानू अबोल झाला. खाणंपिणं त्याला सुचत नव्हतं. खालीं मान घालून तो तासन् तास विचारमग्न होई. आमची शिष्टाई फुकट गेली. त्याची हरतऱ्हेनें आम्ही समजूत घालण्याचा प्रयत्न केला. पण आमचा पूर्वीचा नानू आम्हांला पुन्हा दिसला नाहीं. मनोभंगाचा हा घाव त्याच्या अगदीं जिव्हारीं बसला. त्या घावानं त्याला निष्प्राण केलं. जिवंत मढ्याची कळा आणली. आणि—

आठव्या दिवशीं नानूनं आपल्या कंटाळवाण्या जीवनयात्रेचा शेवट केला!

आतां आम्ही तिघेच आहोंत. जागा मिळेल असं अजूनही आम्हांला वाटतं. त्या मृगजळामागें आम्हीं अजूनही आशेनं धांवत आहोंत. उरीं फुटून मरेपर्यंत आम्हांला धावावं लागणार आहे. अन् एखाद्या दिवशीं नानूचाच मार्ग आम्हांला चोखाळावा लागेल. निदान गोवरी उशाला घेऊन, ओंडक्याच्या बिछायतीवर, एकटं कां होईना, पण ऐसपैस पडायला तरी मिळेल या मार्गानं!

# चारुलता प्रेम करते—

प्रेम करण्याचं तिचं वयच होतं. विशींतल्या तरुणीनं प्रेम नाहीं करायचं, मग काय करायचं ? काय वाती वळत बसायचं ! कां तांदळांतले खडे काढीत बसायचं ?

चारुलतेनें वीसाची सरहद्द ओलांडली होती. तिचं सौंदर्य अभिजात होतं. पावडर, स्नोच्या आधारानें ती आपला गोरेपणा उठवून देत नव्हती. तिचा केतकी वर्ण हें एक निसर्गाचें लेणें होतें गालावरचा ताबूसपणा नकली नव्हता. तिचं सौंदर्य नैसर्गिक होतं त्यांत नटवेपणा नव्हता. स्नो, पावडरची उसनी मिलई नव्हती साधेपणामुळेंच ते जास्त उठून दिसत असे.

अशा तरुणीनं प्रेम नाहीं करायचं, मग कुणी ? शाळेंतल्या 'निराकार' मास्तरणीपेक्षा प्रेम करायचा तिला जास्त अधिकार होता कळकट चेहऱ्यानं नि शिणून भागून बाहेर पडणाऱ्या रेशनिंग–ऑफिसमधल्या मुलीपेक्षां ती जास्त लायक होती. पातळं नि पावडर यांनीं आपल्या सौंदर्याची डागडुजी करून चिमण्यांसारखी चिवचिव करीत हिंडणाऱ्या कॉलेजकन्यापेक्षां प्रेमावरचा तिचा हक्क जास्त सयुक्तिक होता.

चारुलतेनं प्रेम करणं हा गुन्हा नव्हता. पण प्रेम म्हणजे काय हें तिला माहीत नव्हतं. त्या शब्दाचा अर्थ तिला समजत नव्हता. प्रेम म्हणजे काय, याचा उलगडा थोरामोठ्यांनाहि झालेला नाहीं. कामवासना कीं मातृ–भावना का सौंद–

ळ्यांत अजून ते अडकून पडलेले आहेत ज्यांनीं प्रेम केलं आहे त्यांनाहि प्रेम म्हणजे काय हें समजलं नाहीं. जे करतात त्यांनाहि त्याचा अर्थ माहित नसतो. चारुलतेलाहि प्रेमाचा अर्थ माहीत नव्हता. शब्दाच्या अर्थावर तिचं प्रेमच नव्हतं. प्रेमाच्या भार्षेत पुष्कळसे निरर्थक शब्दच योग्य त्या भावना दर्शवूं शकतात.

झालं एवढं शिक्षण तिला पुरेसं वाटत होतं जास्त शिकायची तिची इच्छा नव्हती. बी. ए. होऊन स्वयंपाक करण्यापेक्षां, चार पाच पुस्तकं शिकल्यावर, सरळ चुलीकडे वळण तिला शहाणपणाचं वाटत होतं. "स्त्रियांचं समाजातील स्थान" हा विषय तिला जिव्हाळ्याचा वाटत नव्हता समान हक्क, समान स्वातंत्र्य, समान राहाणी इत्यादि 'समान' तत्त्वं तिला अजून अपरिचित होती. हट्टानं पुरुषांच्या डब्यांत शिरून कोणाचा तरी धक्का लागतांच "धटिंगण मेला" असं बेडर मूर्खपणान किंचाळण्याइतकी ती सुशिक्षित नव्हती लग्न म्हणजे गुलामगिरी ही लग्नाची नवी व्याख्या तिला अजून माहीत नव्हती लग्न कराव नि स्वतःचा संसार थाटावा, अशी तिची माफक महत्त्वाकांक्षा होती.

पुरोगामित्व कीं कायसं म्हणतात तें तिच्यांत नव्हतं. पावसाळी ओढ्याचा खळखळाट तिच्यांत नव्हता. चांदण्यांत न्हाऊन निघणाऱ्या एखाद्या जलाशयाप्रमाणे ती शांत होती. रम्य होती. फॅशनच्या या खळखळाटांत, नि नटव्या सौंदर्याच्या आतषबाजींत तिचं हें भावमधुर नि शात सौंदर्य, सहज कुणाच्या लक्षांत येत नसे

तरीदेखील तिच्या प्रेमासाठीं आसुसलेलें बरेच जीव होते. तिच्या भोंवती दिवसभर पिंगा घालण्यात, ते स्वतःला धन्य समजत आपल्या भोवती, जिभा चाटीत, फेर धरणारे हे प्राणी योग्य अंतरावर ठेवण्याची तिनं दक्षता घेतली होती.

चारुलतेनं प्रेम करावं, या गोष्टीला, या आशाळभूतांचा विरोध नव्हता. अर्थात् त्यांच्या मताला चारुलता कवडीचीहि किंमत देत नव्हती, ही गोष्ट निराळी. पण चारुलता कोणावर अनुरक्त आहे हीच त्यांच्यामतें महत्त्वाची बाब होती.

या आशाळभूतांची चर्चा चाले ती याच गोष्टीबद्दल. हॉटेलमध्यें भजी खातांना किंवा इराण्याकडे चहा पितांना 'चारुलता नि तिची संभाव्य निवड' याच प्रश्नाचं चर्वितचर्वण होई. पण नुसत्या वादविवादानं किंवा मतमोजणीनं हा प्रश्न सुटणारा नव्हता. चारुलतेचे या बाबतचे अधिकार अनियंत्रित स्वरूपाचे होते. कुणाचाहि व्हेटो तिच्या मार्गात येण्याचा संभव नव्हता. म्हणूनच तिच्यावर 'प्रत्यक्ष

वजन' पाडण्याचा प्रत्येकाचा आटोकाट प्रयत्न चाले. त्यांना प्रत्येकवेळी अपयश येई, ही गोष्ट वेगळी पण त्या अपेशी जीवनाची त्यांना चांगली संवय झाली होती. तरीदेखील त्यांचा आशावाद जबर होता. या अपयशांतच आगामी यशाचीं बीजं रुजत आहेत, असा त्यांना विश्वास वाटे.

पण चारुलतेच्या मताचा अंदाज लागतांच त्यांना धक्काच बसला. आतां घोंटाळण्यात अर्थ नाहीं, हें ते समजून चुकले. त्यांनीं माघार घेण्यास सुरवात केली,

चारुलतेचा मतपालट होईल अशी आशा करणं मूर्खपणाचं आहे, ही गोष्ट ते जाणून होते. म्हणून अगदीं निराशेनं त्याना तिचा नाद सोडावा लागला.

पण चारुलतेच्या निश्चयाबाबत साशंक असलेली एक व्यक्ति होती तिचं नाव सोन्याबापू सोन्याबापूला अजूनहि आशा वाटत होती. चारुलतेचं मन वळवून आपण तिला हस्तगत करूं असा त्याला विश्वास वाटत होता

सोन्याबापू तसा पक्का पाताळयंत्री मनुष्य होता. बोलणं मिठ्ठास. वर्तन अगदीं शालिन, पण कृती कसायासारखी, अशा साच्यांतला सोन्याबापू होता. त्याचं लक्ष नेहमीं साध्यावर असे. साधनांची चिकित्सा तो कधींच करीत नसे.

रुबाबदार कपडे सोन्याबापूचं प्रमुख वैशिष्ट्य होतं, या भांडवलावर तो अर्धी अधिक लढाई जिंकींत असे. सोन्याबापू म्हणजे फॅशनचा बॅरोमिटर होता. आज कोणती फॅशन चालू आहे, हें सोन्याबापूच्या कपड्याकडे नजर टाकली कीं ताबडतोब लक्षात येत असे.

फॅशन ही वारांगनेसारखी आहे. या फॅशनच्या नांवाखालीं कोणत्या गोष्टीला केव्हां महत्व येईल, हें काहीं सागता येणार नाहीं. धारवाडी खणाची चोळी घालणारी स्त्री, सीता सावित्रीच्या जमान्यांतली मानली जात असे. पण या युद्धानें तो जमाना बदलला. आज धारवाडी खण हा फॅशनमध्यें मोडूं लागला. धारवाडच्या उदरीं आज शनि आला आहे, हें खरं. शेतकऱ्यांची कोपरी, बुश कोट या ऐसपैस नांवाखाली आज मान्यता पावली आहे.

सोन्याबापू या फॅशनच्या बाबतींत भलताच जागरूक होता. फॅशन हा त्याचा ऐच्छिक विषय होता. या विषयावर एखादा थिसीस तो सहज लिहूं शकला असता. पण गुणांचं चीज करणं, आमच्या विद्यापिठाला न शोभणारं कृत्य होतं.

म्हणून बिचारा सोन्याबापू ' सोन्याबापूच ' राहिला. त्याला डॉक्टरेट मिळायला कसलीच हरकत नव्हती.

पण सोन्याबापूनं या दृष्टीनं अजून विचारच केला नव्हता. या फॅशनच्या जोरावर चारुलता मिळवायची, हेंच त्याचं आतांच ध्येय होतं. इतर कोणत्याच अभिषाला तो भूलण्याचा संभव नव्हता

पहिल्याच फेरींत तो यशस्वी झाला होता. चारुलतेच्या प्राप्तीकरतां घोंटाळ-णाऱ्या तरुणांना चीत करून, तो पुढें चालला होता. विजश्री आपल्यालाच माळ घालील अशी त्याला खात्री होती.

पण लवकरच त्याला कळून चुकलं, कीं नाहीं. अजून फायनल्स व्हावयाच्या आहेत. या फेरींत जर आपण यशस्वी झालों, तरच चारुलता आपली होईल.

सोन्याबापूच्या मानानं त्याचा प्रतिस्पर्धी अगदींच किरकोळ होता. पण त्याच्या दुदैवानं चारुलतेचा कल त्याच्या प्रतिस्पर्ध्याकडे जास्त होता. म्हणूनच या अखेरच्या संग्रामांत आपण यशस्वी होऊंच अशी ग्वाही देणं सोन्याबापूला कठीण वाटत होत.

विश्रामसारखा एका बावळट पोरावर, चारुलतेनं प्रेम करावं, ही गोष्ट सोन्याबापूला नादानपणाची वाटत होती. पण हा नादानपणा स्वत· चारुलताच करीत होती, म्हणून त्याची दखल घेणं त्याला भाग होतं.

विश्राम खरोखर बावळटांत जमा होण्यासारखा होता. त्याला स्वतःच्या कपड्याचीदेखील शुद्ध नसे. केंसाची नि फणीची कधीं गांठच पडत नसे. निर-निराळीं सुवासिक तेलं नि ब्रिलियनटाईन्स खास केसांना लावण्याकरतां तयार केली जातात ही गोष्ट त्याच्या गांवींहि नव्हती. नेटनेटकेपणा त्याच्या पाचवीला पुजलेलाच नव्हता.

तो निष्कांचन होता, अशांतला भाग नाहीं. पैसा असूनहि त्याचं वागणं हें असं गैरहिशोबी होतं. तसा तो निर्व्यसनी होता. सुपारीच्या खांडाचंदेखील त्याला व्यसन नव्हतं. नाहीं म्हणायला पुस्तकं वाचण्याचा त्याला जबरदस्त नाद होता. नाद कसला वेडच होतं तें. त्याची खोली पुस्तकांनीं भरून गेली होती. टेबलावर नेहमीच कोरी पुस्तकं पडलेली असत. ती खोली, आपण नि पुस्तकं हेंच त्याचं जग होतं.

पण तो माणुसघाण्या नव्हता. प्रथम दर्शनीं तो तुसडा वांटण्याचा संभव होता. पण एकदा का परिचय झाला, कीं त्याच्यासारखा मिठ्ठास माणूस नाहीं मिळायचा. स्थळ-काळाची विस्मृती होण्याइतकं त्याचं बोलणं प्रभावी होतं.

विश्राम एक रसिक वाचक होता. त्याचं वाचन चौफेर होतं. त्यामुळें तो एकाद्या विषयावर बोलूं लागला कीं ऐकणाराला किती तरी नवीन माहिती होत असे. त्याच्या बोलण्यांत आढ्यता नसे. विद्वत्तेचा दर्प नसे.

चारुलता विश्रामकडे ओढली गेली, ती याच गुणामुळें. तसं म्हटलं तर, तरुणीनं वेडं व्हावं असे गुण विश्राममध्यें नव्हते. त्याचा गबाळेपणा कोणत्याहि तरुणीला आवडणारा नव्हता. विश्राम म्हणजे कोंकणातला फणस. बाह्यरूप म्हणजे खडकाळ कांटेरी साल, पण अंतरंग म्हणजे अमृत. परिचयाशिवाय विश्रामाच्या अंतरंगाची ओळख पटणं शक्य नव्हतं. पण बाहेरच्या स्वरूपाला पाहून लुब्ध होणाऱ्या तरुणींना तेव्हढा वेळ नव्हता. विश्रामशीं ओळख करून घेणं त्यांना कमीपणाचं वाटे.

बाह्यस्वरूपाला भाव येत असल्यामुळें सोन्याबापूसारखे वीर म्हणून गणले जात होते. कोणत्याही तरुणीची ओळख करून घेणं सोन्याबापूला, अगदीं हातचा मळ वाटे तो याचमुळें.

या तरुण पोरी आपल्याला काय किंमत देतात, हें विश्राम जाणून होता. पण त्याची दखल त्यानें कधींच घेतली नाहीं. उलट त्याबाबत तो जास्त उदासीनता दाखवूं लागला.

चारुलता याच तरुणींपैकीं होती. पण सुदैवानें तिला विश्रामचं जीवन अगदीं जवळून पाहण्याची संधि मिळालेली होती. म्हणूनच तिच्या मनाचा कांटा विश्रामकडे झुकत होता.

तिचा अजूनहि ठाम निश्चय झालेला नव्हता. विश्रामबद्दल ती अजूनहि साशंक होती. हा गबाळ्या तरुण जीवन-संग्रामांत कितपत टिकूं शकेल, याबद्दल तिला धास्ती वाटत होती. आपलं संरक्षण करण्याची धमक याच्या अंगीं नसावी असं तिला विनाकारणच वाटे.

बाहेरून परकेपणाचा आव आणून सोन्याबापू नेमका याच वर्मावर बोट ठेवित असे. कसंहि करून विश्रामबद्दल तिच्या मनांत अप्रीति उत्पन्न करायची,

ह्याच त्याचा हेतू होता. तसं झालं म्हणजे त्याचा मार्ग मोकळा होत होता. त्याचं ईप्सित पुरं झालं असतं. पाताळयंत्री सोन्याबापू उघड्या डोळ्यांनीं पराजय पाहण्याइतका खिलाडू वृत्तीचा नव्हता.

विश्रामच्या या गबाळेपणाबद्दल, चारुलतेनें त्याला एकदोनदा हटकण्याचा प्रयत्नहि केला होता, आपली तीव्र नापसंतीहि तिनं दर्शविली होती पण विश्राम उदासीन होता. तिच्या पसंती नापसंतीबद्दल तो स्वत बेफिकीर होता. उलट सोन्याबापूचा नीटनेटकेपणा कौतुकास्पद होता. एकादा रंग वा एकादी पद्धत तिला आवडत नसली की सोन्याबापू ती कटाक्षानें टाळी तिला सिगारेटचा वास सहन होत नाहीं, हें कळल्याबरोबर त्यानें सिगारेट ओढणं सोडून दिलं.

सोन्याबापूची जागरूकता विश्रामच्या ठायी नव्हती. पण सोन्याबापूबरोबर आयुष्य कंठण्याची कल्पना स्वत चारुलतेला पटत नव्हती. त्याचे तें पुढें पुढें करणं, ती दिखाऊ आदब, ही तिला किळसवाणी वाटत होती.

लग्नाच्या बाबतींत, तिला तिच्या वडिलानी स्वातंत्र्य दिल होतं "आमच्या मुलीला निवडीचं स्वातंत्र्य आहे" असं सांगण्याची जी फॅशन आहे, त्याच परंपरंतलं हें स्वातंत्र्य होत अर्थात् हें स्वातंत्र्य दिखाऊ आहे, हें चारुलतेला माहीत नव्हतं. विश्राम नि सोन्याबापू याच्याबद्दलची अगदीं बारीकसारीक माहिती, तिच्या वडिलानीं गुप्तपणें मिळवून ठेविली होती.

आपल्या वडिलांचा कल विश्रामकडे आहे. ही गोष्ट चारुलतेलाहि माहीत झालेली होती. पण विश्रामच्या बाबतींत ती अजून साशंक होती. संशयाचं निराकरण झालेलं नव्हतं.

कपड्याबाबतच्या त्याच्या गबाळेपणाबद्दल तर बोलायची सोयच नव्हती. "कपडे माझ्यासाठीं आहेत. मी कपड्यांसाठीं नाहीं. कपड्यांची गुलामगिरी मला नामंजूर आहे. मी आहे हा असा आहे. तुला चागले कपडे आवडत असतील, तर एकादा सुंदर सूट आणून त्याच्यावर प्रेम कर" असं विश्राम तिला म्हणाला होता.

त्याच्या या स्पष्ट बोलण्यानं तिला धक्काच बसला.

पण विश्रामचा हा हटवादीपणा पाहूनहि, त्याचं आकर्षण कमी झालं नाहीं. उलट ते दुणावलं. तिला विश्रामच आवडत होता. तिचं विश्रामवर प्रेम होत. त्याच्या संगतींत आजहि ती स्वतःला विसरून जात असे.

हा अनुभव सोन्याबापूच्या सहवासांत तिला येत नसे. त्याच्या संगतीत तिला तेव्हढी सुरक्षितता वाटत नसे. म्हणून त्याच्या सहवासांत ती फार सावधानता बाळगी. न जाणों, एकाद्या असावध क्षणाचासुद्धां तो फायदा घेतल्यावांचून राहणार नाहीं, अशी तिला धास्ती वाटे. आपल्याला असं कां वाटतं, हें तिला समजत नसे. तिचं मन सोन्याबापूची विश्रामबरोबर तुलना करूं लागे विश्रामचं पारडं नेहमींच जड होत असे. सोन्याबापूचा शालीनपणा तिला नाटकी वाटे. एक तऱ्हेचा सूक्ष्म तिरस्कार त्याच्याबद्दल तिला वाटूं लागला होता

पण विश्रामबद्दलची ती दुष्ट शंका पुन्हां डोकं वर काढी. तिला निर्णय घेणं अशक्य होई मन दोलायमान झालं होतं तिचं काय करावं हें तिला समजेनासं झालं होतं

आपलं डळमळणार स्थान सोन्याबापूच्या लक्षात आलं होतं. जर वेळींच निकराचा प्रयत्न केला नाहीं, तर गोष्ट आंगलट येण्याचा संभव आहे, हें त्याला पुरतेपणीं उमगलं होत विश्रामचा काटा मार्गांतून दूर केलाच पाहिजे, हें त्याला पटत होतं विश्राम कसा बदनाम होईल, हीच त्याला चिंता पडली होती.

सत्कृत्याना सहाय्यकर्ता कधीच लाभत नाहीं. उलट दुःष्कृत्यांना सैतानाचं सहाय्य नेहमीच मिळतं.

सोन्याबापूला हवी असलेली संधी लवकरच मिळाली.

विश्राम हा नुसताच नेभळट आहे, इतकंच नव्हे तर तो पक्का घाबरटहि आहे, असं त्यानं चारुलतेला सांगितलं होतं तो किती भित्रा आहे, याबद्दलच्या चार दोन गोष्टीहि त्यानें तिला बनवून सांगितल्या होत्या. असल्या या भेकड तरुणाबरोबर, तिनं लग्नाला कबूल होणं ही गोष्ट तिलाच घातक होईल असं त्यानें तिला भासवून दिलं होतं.

त्याच्या या शिकवणीचा अपेक्षित परिणाम चारुलतेवर झाल्यावांचून राहिला नाहीं. म्हणूनच अजूनपर्यंत, तिनं विश्रामला कसलंच वचन दिलं नव्हतं.

सोन्याबापू हें जाणून होता; म्हणून तो जरासा खुषींत होता.

चारुलता विश्रांमबरोबर सिनेमाला गेली तीदेखील असल्या अस्थिर मनःस्थितींत.

पण सोन्याबापूला हवी असलेली संधी, त्यामुळें विनासायास मिळाली.

ती रात्र होती अंधारी. रस्त्यावरील दिव्याचा प्रकाश गल्लीच्या तोंडावरच जेमतेम पसरलेला होता. गल्लींतला तो भयाण अंधःकार पाहून चारुलता हबकूनच गेली. गल्लींतल्या त्या काळोखाला बाजूच्या वाड्यांतील भयाण शांतता मदत करीत होती.

विश्रामचा हात पकडीत तिनें विचारलें' " या काळोखांतून का जायचं ? "

" मग काय इथं गल्लीच्या नाक्यावरच मुक्काम करायचा वाटतं ? " विश्राम हंसत हंसत म्हणाला.

" पण मला भीति वाटतेय. "

" वेडी आहेस तूं चल मी आहे ना तुझ्याबरोबर ? चल तर मग. काळोख का तुला खाणार आहे ? "

नाईलाजानं तिला पाऊल उचलणं भाग पडलं.

अर्ध्या अधिक अंतरावर कोणीतरी त्यांना अडवलं. चारुलतेची बोबडीच वळली. तिच्या तोंडांतून शद्बोच्चारहि स्पष्ट निघेनात. "चोर चोर" करीत ती विश्रामला घट्ट बिलगली.

या अनपेक्षित हल्ल्यानं विश्रामदेखील गांगरला. सुरे दाखवून पैसे लुबाडणाऱ्या टोळीची, रसभरीत वर्णनं त्यानें वर्तमानपत्रांत वाचलीं होती. आज तोच प्रसंग त्याच्यावर गुदरला होता. तो एकटा असता, तर अंगातला कोट त्या मवाल्याच्या अंगावर टाकून तो निघून गेला असता. पण तो एकटा नव्हता चारुलता त्याच्याबरोबर होती. तिचं रक्षण करणं त्याचं कर्तव्य होतं. तिच्या वडिलांनीं त्याच्याबरोबर तिला पाठविली होती. आज ती दुसऱ्याची मुलगी होती. पण उद्यां ती त्याची बायको झाल्यावर जर असा प्रसंग ओढवला तर त्याला निष्क्रीय राहतां येईल का ?

क्षणरभांत हें विचार त्याच्या डोक्यांत चमकून गेले. एकच क्षण, नि दुसऱ्या क्षणीं चारुलतेला एका हातानं घट्ट कवटाळीत पुढें येणाऱ्या त्या व्यक्तीला त्यानें एक जबरदस्त टोला लगावला.

" मेलों मेलों " असं ओरडत ती व्यक्ति खाली कोसळली.

तो आवाज दोघांनाहि ओळखीचा वाटला

खिशांतली आगपेटी काढून, त्यानें कांडं उजळलं सोन्याबापू जमिनीवर उताणा पडलेला होता.

आगकाडीच्या प्रकाशांत, सोन्याबापूचा चेहरा दृष्टीस पडतांच, चारुलतेच्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला.

चकाकणारं पितळ नि सोनं यांतला फरक तिला आतां समजून चुकला

निःशंक मनानें विश्रामचा हात धरून, तिनें चालावयास सुरवात केली

---

## स्त्री !

चेंबूर २८ जानेवारी १९३ ×

रा. रा. अण्णासाहेब सबनीस यांस—

आपणास देत असलेल्या तसदीची क्षमा करा. कांचनपूरला असतांना मी आपणांस वेळोवेळी सुचविलें होतें कीं, हा होऊं घातलेला संबंध मला पसंत नाहीं तुम्हांला माहितच आहे कीं मी जुन्या जमान्यांतील मनुष्य आहे. मला तुमचे हे नवीन थेर पसंत नाहीत, आणि या बाबतींत बापाला बाप न म्हणणारा मी, पोराला डोईजड होऊं देणार नाहीं.

चंदूवर तुम्हीं काय मोहिनी टाकली आहे ती कळत नाहीं. तो पोर पण हल्लीं प्रेमाची जपमाळ घेऊन बसलाय. पण अण्णासाहेब, हें त्याचें प्रेम उधळून लावून, त्याला ताळ्यावर आणावयास मला बिलकूल वेळ लागणार नाहीं. दिडकी कमवायाची अक्कल नाहीं, आणि म्हणे प्रेम करतोय. चंदी बंद केल्यावर हें प्रेमबीम आपोआप वितळून जाईल.

पण तुमच्यासारख्या शहाण्या मनुष्यानें या असल्या पोरखेळास उत्तेजन द्यावें याचें मला आश्चर्य वाटतें. कां हुंड्याविना पोरगी उजविण्याची ही युक्ति तर नाहीं ना ? कांहीं असो, पण हे पोरखेळ आतां बंद झाले पाहिजेत. लोक थुकतात. याची तुम्हांला नसली तरी आम्हांला लाज आहे.

योग्य तो बंदोबस्त होईल अशी आशा आहे,

आपला,

तात्यासाहेब कुलकर्णी.

× × × ×

चेंबूर, १ मार्च १९३४

प्रिय लीला,

रागामुळें वक्र झालेल्या त्या तुझ्या भिवया, पुरीप्रमाणें फुगलेले गाल अनियमितपणाबद्दल माझा होत असलेला उद्धार, अन् शेवटीं आपलंच कर्म खोटं असं म्हणत आपल्या टेबलावरल्या पुस्तकांची होणारी आदळआपट, हीं सारीं मला इथूनही दिसतात. लीले, क्षमा कर हं या उशीराबद्दल. कांहीं अपरिहार्य कारणामुळें . पण तसं कशाला ? तुला आज ना उद्या सर्व सांगावें लागणारच ना ?

हें पहा लिलू, त्याचं असं कीं एका मुलीच्या प्रेमपाशांत मी अडकलोंय. ती मुलगी सुंदर आहे नी बुद्धिमानही आहे. अन् किती छान् छान् कविता करते ती. गाते किती गोड म्हणून सांगूं ? आणि तिचे ते टपोरे पाणीदार डोळे पाहिले कीं मला...पण जाऊं दे. झालं, फुगवलेस गाल. तुम्हीं बायका म्हणजे....

पण आमच्या तात्यांच्या मतें ही गोष्ट कुळाला कालिमा आणणारी आहे. अन् त्यांना कुणीसं सागितलं कीं हा प्रेम म्हणून जो रोग आहे, त्याची बाधा कॉलेजांत होते, व जर रोगी या रोगापासून मुक्त व्हावा अशी इच्छा असेल, तर त्याला कॉलेज वातावरणापासून शक्य तितका दूर ठेवावा.

मला या रोगाची भावना आहे, ही गोष्ट तात्यांना कळून चुकल्यामुळें 'इंडियन फादर्स कोडच्या' कलमान्वयें त्यांनीं कॉलेजबंदीचा हुकूम माझ्यावर बजावला आहे, आणि हुकुमाचें अतिक्रमण झाल्यास आजन्म गृहत्यागाची शिक्षा फर्मावण्यांत येईल, असा दम देण्यांत आला आहे.

लीले, मी त्यावेळीं काय केलें असेन अशी तुझी कल्पना आहे ? संतापलों–ओरडलों–किंचाळलों, आत्महत्या केली ? शांतपणें ऐकून घेतलें व संध्याकाळीं आईच्या मध्यस्तीनें नोकरीची खटपट करण्याकरतां तात्यांकडे एक विनंति–अर्ज फेंकून दिला. ×

या धामधुमींत डोकें खरासें तापलें, हें खरं. अन् तेंच उशीराचें कारण

माझें हें वर्तन आजच्या तरुणाला शोभेल असं नाहीं, हें खरं आहे. पण माझें लक्ष साध्यावर असल्यामुळें मी साधनाची विचक्षणा करीत बसत नाहीं. शब्दावडंबरानें तुझी दिशाभूल करावी असा माझा हेतू नाहीं. पण केवळ तुझ्या प्राप्तीकरतां मी हें कपटाचरण करीत आहें. तुला माहितच आहे कीं तुझ्यापुढें

स्वर्गदेखील मला कःपदार्थ वाटेल. हें जरी खरं असलं, तरीदेखील परिस्थितिचा विचार आपल्याला केला पाहिजे. अविचारानें भांडून, कार्यनिष्पत्ती कांहीं न होतां, कार्यहानी मात्र होईल.

मी आज घराबाहेर पडलों तर त्याचा काय उपयोग आहे ? उलट थोडें फार तात्यांच्या कलानें वागून मी नोकरी पदरांत पाडून घेतों, म्हणजे पुढें आपल्याला अन्नाला महाग होण्याची वेळ येणार नाहीं. उगाच भावनावश होण्यांत काय अर्थ आहे ? शिवाय एक गोष्ट लक्षांत ठेव कीं ज्यावेळीं आपण विवाहबद्ध होऊं, त्यावेळीं एकमेकाशिवाय दुसरं आपलं म्हणणारं जग आपणाला राहणार नाहीं. तात्या माझं तोंड पहाणार नाहींत, अन् तुझा अविंदादा तर तुला एक क्षणभरदेखील घरांत घेणार नाहीं. अन् अण्णासाहेब—ते तरी अविपुढें काय बोलणार. या सर्व गोष्टींचा आपणांस विचार केला पाहिजे.

म्हणून हल्लीं मी एक आज्ञाधारक पुत्र बनण्याचा प्रयत्न चालू केलाय. लिलू, तुला माहीत आहे, हल्लीं मी ती दुखांबी परकरवजा विजार न नेसतां धोतर नेसूं लागलोय तो ?

काचा तर असा झकास मारतों कीं, एकादा पुणेकरदेखील गार होईल. अन् आज्ञाधारकपणाचा अभिनय इतका झकास वठतोय कीं बाबुराव पेंढारकरदेखील अजिंक्यपत्र लिहून देतील.

कांहीं झालं तरी " तूं माझी अन् तुझा मी " असं झालंच पाहिजे. थोडेसे " ग्रह " वक्री आहेत. त्यामुळें त्रास हा व्हावयाचाच.

अरेच्चा ! तात्या आलेच कीं ऑफिसमधून ! बरंय लिलू, म्हटलं असूं द्या तुमची कृपादृष्टी.

तुझाच,
चंद्रकांत.

× × × ×

चेंबूर, २३ मार्च १९३×

रा. रा. अण्णासाहेब यांस—

या बाबतींत लिहिलेलें हें शेवटचेंच पत्र ठरेल अशी अपेक्षा आहे. मागें मी लिहिलेल्या त्या पत्राचा आपण विचारही केलेला दिसत नाहीं; नाहींतर कालचा प्रसंग घडता ना.

चंद्रकांत–लीलेच्या गुप्त भेटी होतात, अशी मला कुणकुण होती, व त्याचा योग्य तो बंदोबस्त मी केलाच आहे. पण आपली कन्या निर्लज्जासारखी, चंदूला भेटावयास, त्याच्या बापाच्या घरीं येईल अशी माझी कल्पना नव्हती.

गेले आठ दहा दिवस चंद्रकांत विषमज्वरानें आजारी आहे हे आपणांस कळलेलें दिसतेंय. आजारीपणांत माणसाची प्रकृति तोळामासा होते, हें आपल्यासारख्या सुधारकी सूज्ञास सांगण्याची जरूरी नाहीं पण अशा या परिस्थितींत, आपल्या सुलक्षिणी कन्येनें चंदूला भेटण्याचें धाडस करून त्याची प्रकृति अधिक बिघडविण्यास मदत करणें, हें जरी आपल्या सुधारकी संप्रदायास पुष्टीदायक असलें, तरी माझ्या सनातनी पितृहृदयास मान्य नाहीं. "प्रेमाचें माणूस" भेटल्यावर माणसाची प्रकृति, प्रथम कांही काळ अधिक बिघडल्यासारखी वाटे, असा मानसशास्त्रांतील एकादा सिद्धांत माझ्या तोंडावर टाकून या प्रसंगाचें समर्थन करण्याचा व्यर्थ प्रयत्न करूं नका.

जिच्या दोन तासाच्या सांनिध्यानें माझ्या मुलाची प्रकृति अधिक बिघडते अशा पायगुणाच्या आपल्या कन्येबरोबर, चंदूनें आपलें आयुष्य घालवावें, हा आपला प्रयत्न माणुसकीला सोडून आहे. मुलाच्या प्रकृतीची काळजी जास्त वाटत असल्यामुळें मला आपल्या कन्येला हात धरून बाहेर काढावी लागली

असले थेर यापुढें बंद होतील अशी आशा आहे; नाहींतर माझ्या मुलांचे जर कांहीं बरें वाईट झालें, तर त्याची जबाबदारी तुम्हावर येईल

आपला,

तात्यासाहेब कुलकर्णी

\+ + + +

कांचनपूर. २५ मार्च १९३x

चि. अविनाश यास,

सोबत पाठविलेल्या तात्यासाहेबांच्या पत्रावरून माझ्या मनःस्थितीची तुला कल्पना येईलच. समाजानें केलेला उपहास मी आजपर्यंत निमूट सहन केला. निनांवी धमक्यांचीं पत्रें विचलीत मनानें बंबांत टाकलीं. प्रत्यक्ष पोटच्या पोराचे -तुझे-वाग्बाण सहन केले. कशासाठीं? लीलेच्या सुखासाठीं मातृविहीन पोरीसाठीं जें कांहीं केलें त्याचें हें फळ!

चंद्रकान्त-लीलेच्या लग्नाच्या तूं विरुद्ध होतास व आहेसही. पण हें लग्न केवळ तुझ्या मानी स्वभावामुळें तुला दूषणीय वाटतें. तुझ्या मित्राला लीलेनें नकार दिला, म्हणून तूं लीलेचा व चंद्रकान्ताचा द्वेष करतोस, ही गोष्ट मला माहित आहे.

खरं म्हटलं तर या दोघांचा विवाह मी अगोदरच उरकून घ्यावयास पाहिजे होता. पण मी माझी शाब्दिक अनुमतिदेखील त्यांना दिली नव्हती मात्र हा विवाह मला मान्य होता. पण म्हटलं, मुलगा शिकतोय अन् लीलीचंदेखील शिक्षण चालूंच आहे. शिक्षण झालं म्हणजे बघू

तात्यासाहेबाची विरोधी मतें मला माहित होतीं, व पैशाच्या अमिषाला हा सनातनी मासा गळाला लागेल अशी माझी कल्पना होती म्हणून आजपर्यंत या प्रकरणात मी मूग गिळून बसलों होतों पण काय झालं हें आता ?

तात्यासाहेब इतके हटवादी व आततायी असतील अशी कल्पनादेखील मला नव्हती. पण या त्यांच्या कृत्यानें माझ्या हृदयावर कल्पनेबाहेर खोल जखम झाली आहे. हा अपमान मला सहन होत नाहीं. आजपर्यंत कुणाचाही उणा शद्ब मी ऐकून घेतला नाहीं. पण त्या मानी हृदयाला आज केवळ पोटच्या मुलीमुळे असा मान खालीं घालण्याचा प्रसंग यावा ना ?

चंद्रकान्त-लीला एकमेकांवर अनन्यभावें प्रेम करतात हें खरं. पण माझा असा अपमान करणाऱ्या तात्यासाहेबांचा चंद्रकांत मुलगा आहे ही गोष्ट, मला नजरेआड करतां येन नाहीं काय करूं ? अवि, मस्तक सुन्न झालंय. तूं इकडे ये, व बघ कांहीं सुटकेचा मार्ग निघतो का ?

तुझा पिता,

अणासाहेब.

× × × ×

कांचनपूर १, एप्रिल १९३×

ती. अण्णा यांस—

काय लिहावें हेंच कळत नाहीं मला. आतापर्यंत ज्या प्रेमळपणाने माझें संगोपन केलेंत, त्याचे गोडवे गाऊं, कीं प्राप्त झालेल्या परिस्थितीबद्दल तुमचा निषेध करूं ?

खरोखर, अण्णा, आजपर्यंत मला तुमचा मोठा आधार वाटत असे. तुमच्या आधारावरच ना मी आजपर्यंत समाजाशीं बेडरपणें वागलें ? शाळेंत जातांना, ठायीं ठायीं स्थिरावलेल्या गांवकुटाळांचे हृदयभेदी वाग्बाण, समाजकंटकाचीं धमकीचीं पत्रें, शाळेंतल्या विद्यार्थीवर्गानें बहिष्कार टाकून केलेली कुचंबणा, ही सर्व तुमच्या आधारावर अन् चंद्रकान्ताच्या शद्बावर मी सहन केली; आणि आज जरी चन्द्रकान्त चेंबूरला रहावयास गेले, तरी तुमच्या एकट्याच्या आधारावर मी हें सहन करीत होत्यें. चंन्द्रकान्तावरील प्रीतीची लता, अण्णा, तुमच्याच आधारावर फोंफावत होती. पण तो आधार आज कोसळून पडावा ना !

अवि एक हडेलहप्पी, नादान तरुण आहे. त्याच्या मित्राला दिलेल्या नकाराचा सूड तो आज न उगवतां तर केंव्हा ? कारण त्याचा मानी स्वभाव मी दुखवला आहे ना !

त्याला काय पण तुम्हांलादेखील स्वतःचा मान, अभिमान दिसतोय. जणू काय इतरांना त्या भावना नसतातच ! " सुरेशशीं लग्न केलेंच पाहिजे " हें सांगताना अविनें तरी माझ्या भावनाचा विचार केला होता का ?

कशाला करील ? मी एक स्त्री आहें ना ! स्त्रियांना कुठें भावना मन असतें ! ......जाऊ द्या. पण अण्णा, पुरुषप्रधान समाजरचनेंत स्त्रियाचे मनच काय पण शरीरदेखील मारलें जातें, ही गोष्ट आज प्रथमच मला कळली.

समाजकंटकांच्या वाग्बाणानी, जें तुमचें हृदय विद्ध झालें नाहीं, तें हृदय मानापमानाच्या खोट्या कल्पनेनें घायाळ व्हावें हें दुर्दैव नाहीं कां ? एकच गोष्ट तुमच्या लक्षांत यावयास पाहिजे होती कीं तात्यासाहेबाबरोबर मला जन्म काढायचा नव्हता. बापाच्या अपराधाचें प्रायश्चित पुत्राला द्यायचें हा न्याय कुठला ? पण अण्णा, माझ्या दुर्दैवानें तुम्हीं या खोट्या अभिमानाच्या आहारीं गेल्यांत.

घरांतच हें असें सहारा वाळवंट निर्माण झालं आहे. सहानभूतीचा ओलावा मिळणें तर शक्यच नाहीं, पण उपहासाचे चटके मात्र भरपूर बसत आहेत.

या अशा बिकट वेळीं चंद्रकांत अत्यवस्थ स्थितींत बिछान्याला खिळून पडले आहेत. जिच्यासाठीं मृत्यूशीं ते इतक्या कसोशीनें झुंजत आहेत, तिची आजची अवस्था त्यांना कळली तर...

सर्व बाजूनीं कसा कोंडमारा झालाय. आज आई असती तर! अण्णा, हें नाहीं मला सहन होत कोणाच्या आधारावर, कोणत्या आशेवर सहन करूं? एक आधार तुटला अन् दुसरा, चंद्रकात अस्तित्वासाठीं धडपडत आहे.

अण्णा, तुमची संमती आजहि कायम असती तर मला केवढें समाधान झाले असतें! पण सर्वच गोष्टी इच्छेप्रमाणें होत्या तर—आता घरांतल्या आणि बाहेरच्या विरोधाला बेडरपणानें तोंड देण्याचेंच मी ठरविलें आहे. स्त्रिया दुबळ्या असतात, त्या भेकड असतात, त्या परावलंबी असतात, या समाजाच्या कल्पनेला जोराचा धक्का देण्याचे कार्य मला करावयाचें आहे अण्णा, तुमच्या या मुलीला, या विचार व आचार क्रान्तीच्या प्रयोगात यश येऊं द्या, एवढाच आशिर्वाद द्या.

चन्द्रकान्ताशीं लग्न-बंधनानें निगडीत होण्याचें मी ठरविलें आहे. सध्यां ते मृत्यूशी झगडत आहेत याची जाणीव मला नाहीं असें नाहीं. पण तुमच्या माझ्या सर्वांच्या सदिच्छेनें ते जगतील असा मला बळकट विश्वास आहे. आणि ते चागले बरे झाल्यावर–अगदीं पहिल्याच मुहूर्तावर—

अण्णा, क्षमा करा तुमच्या या बडखोर मुलीला. तुमच्या अन्तःकरणांतील सारा प्रेमळपणा नि सात्विकपणा या वेळीं जागा होऊं द्या. ती पहा आईसुद्धा तुम्हाला स्वर्गांतून तशी विनंती करीत आहे. तिच्या विनंतीला तरी मान देऊन माझ्यावर रागावूं नका.

माझ्या या कृत्यानें अवि मला पुन्हा घरात येऊं देणार नाहीं हें मी जाणून आहें, आणि म्हणूनच मी आज 'घराबाहेर' पडत आहें ती परत न येण्याच्या हेतूनेंच. तुम्हीं मला मधून मधून येऊन भेटलांत तर मला केव्हांहि आनन्दच वाटेल. प्रेमळ पित्याच्या भेटीची उत्कंठा कुणाला नसणार?

तुमची,

लीला.

---

# देवानय्

चायनाबझारमधील आपली खरेदी आटपून रामनाथ अय्यर सपत्निक एका उपहारगृहांत शिरले फराळ आटोपून ते बाहेर पडले. गार्डीत शिरतां शिरतां आपल्या पत्नीकडे पहात ते म्हणाले, " काय समुद्रावर जायचं ना ? "

" काय समुद्रावर !" सीतालक्ष्मी कपाळावर आठ्यांचं जाळं गुंफीत म्हणाली, " मला गर्दीची ठिकाणं आवडत नाहींत "

तेव्हढ्यात तिचं लक्ष एका खेळणीवाल्याकडे गेलं. रामनाथ अय्यरचं लक्ष तिकडे वेधित, ती म्हणाली, " मुलांना थोडीशी खेळणीं घेऊं या. "

पण सीतालक्ष्मीचं वाक्य पुरं होण्यापूर्वीच त्या खेळणीवाल्यानें मोटारच्या दिशेनें पावलं टाकण्यास सुरवातही केली होती.

सौद्याच्या घासाघाशीला सुरवात झाली.

गाडीच्या दुसऱ्या बाजूला, एक तरुण भिकारीण, आपल्या तान्ह्या मुलाला घेऊन उभी होती. आपुल्या तान्हुल्याच्या दुधाकरतां, ती अजीजी करीत होती. पण तिच्याकडे कुणाचेही लक्ष नव्हतं

" ही सारीं जपानीं खेळणीं ना ? " रामनाथ अय्यरनीं विचारलें.

" होय साहेब. आपल्याकडे कोण असली खेळणीं बनविणार ? " खेळणीवाला उत्तरला.

पुन्हां त्या भिकारणीनें याचना केली.

" काय कटकट आहे ! भिकाऱ्याचा उपद्रव फारच वाढलाय अलिकडे." सीतालक्ष्मी पुटपुटली.

पुन्हां त्या भिकारणीनें हात पसरला.

" जातेस निमूट कां पोलीसाला बोलावूं ! " सीतालक्ष्मी त्या भिकारणीवर कडाडली.

पण सीतालक्ष्मीच्या दमदाटीकडे लक्ष न देता तिने लोंचटपणे तिच्या पायाना हात लावित म्हटले. " " अम्मा, या पोरावर दया करा तीन दिवसात एक थेंबभरही दूध नाहीं मिळालं लेकराला, अम्मा. एक आणा द्या. ईश्वर तुमचं भलं करील. अम्मा, एक आणा, तुमच्या हिशोबीं नाहीं, पण माझ्या लेकराला त्यानें जीवदान मिळेल अम्मा--"

रामनाथ अय्यरची खरेदी आटोपली होती. त्यानीं गाडी सुरूं करण्याची सूचना दिली ड्रायव्हरनें त्या भिकारणीला दूर हटण्यास सांगितले, नि गाडी सुरूं केली धांवत्या गाडीबरोबर, त्या भिकारणीनेही धावण्यास सुरवात केली. पण तिची ती धांवपळ निष्फळ होती.

" गाडी मागं धावूं नकोस " रामनाथ अय्यर त्या भिकारणीकडे वळत म्हणाले. प्रथमच त्यांना त्या भिकारणीचा चेहरा पाहण्यास सापडला. क्षणभर ते तिच्याकडे टक लावून पहात होते. पण गाडीने वेग घेतला, नि ती भिकारीण मागें पडली.

त्या भिकारणीचा चेहरा त्यांना ओळखीचा वाटला. केव्हा नि कुठं तिला पाहिली असावी, हें त्यांना स्मरेना.

गाडी वेगांत होती. आपल्या पत्नीकडे वळत रामनाथ म्हणाले, "गरीब बिचारी. मला वाटतं ती आपल्या गांवची असावी. "

" तर तर " सीतालक्ष्मी उसळून म्हणाली " भिकारणीची कुलकथा कोण आणून देतो. पण विमान चावीचं आहे कां ?" तो विषय उडविण्याच्या हेतूनं ती पुढें म्हणाली.

रामनाथ अय्यरनीं त्या प्रश्नाकडे दुर्लक्षच केलें.

× × ×

सेलम शहरांत, एक गरीब कोष्टयाचं कुटुंब रहात असे. पळमीअम्मालला दोन मुलं होती मोठा मुलगा वैय्यापुरी तीस वर्षाचा होता, नि मुलगी देवानय् वीस वर्षांची होती. काबाडकष्ट करूनच या गरीब कुटूंबाची गुजराण होत असें. महिन्या काठी मिळणाऱ्या चार रुपड्यांवर, ते कसे तरी जगत होते.

त्याच्या पिढीजात कोष्टयाच्या धंद्याला, आता वाईट दिवस आले होते. हातमागाच्या कापडाला गिऱ्हाईक भेटणं मुष्कीलीचं झालं होतं. त्याचमुळें या धंद्यावर, ज्याचं जीवन होतं, त्याचं पोट भरणं ही गोष्ट अशक्य होऊं लागली. वैयापुरी याला अपवाद नव्हता.

देवानय दोन सेवानिवृत्त ब्राह्मण कुटूंबात घरकामाला जात असे. तिला महिना तीस रुपये मिळत. तिची म्हातारी आई, असंच काहीतरी करून महिनों रुपया मिळवित असे.

वैयापुरी नोकरीसाठी वणवण फिरत होता. त्याचे प्रयत्न निष्फळ ठरत आपल्या मित्राबरोबर बंगलोरला जाऊन, आपल्या नशिबाची परिक्षा पाहण्याचं त्यानें ठरविलं, नि पळमीअम्मालला तसं सांगून, त्यानें घर सोडलं.

वैयापुरीचं थोडं फार शिक्षण झालेलं होतं त्याच्या वडिलांनीं त्याला म्युनिसिपालटीच्या शाळेंत घातला होता पण त्यावेळची परिस्थिती फार वेगळी होती कोष्टयाचं जीवन त्यावेळीं इतकं खडतर नव्हतं.

काहीं दिवसांनीं वैयापुरीचं एक पत्र त्याच्या आईला मिळालं तो लिहीत होता—"बऱ्याच मूठी दाबल्यावर, एका गिरणींत मला काम मिळालं आहे. एक मजूर म्हणून मी गिरणींत काम करीत आहे मला आठ आणे रोज मिळतो, म्हणजे महिन्याचे तेरा रुपये मिळतात.

पहिला पगार, मला इथं स्थाईक होण्याकरतां नि वेळोवेळीं घेतलेले हात उसने कर्ज फेडण्यासाठींच खर्च करावा लागणार आहे. पुढल्या पगाराला दोन रुपये पाठवून देईन,"

वैयापुरीच्या या पहिल्या पत्रानें मायलेकी हरखून गेल्या. अस्मान ठेंगणं वाटूं लागलं त्यांना. आपल्या या खडतर जीवनांतदेखील सुखानें अगदींच पाठ फिरविली नाहीं, असंच त्यांना वाटत होतं

दहा दिवसानंतर वैयापुरीचं दुसरें एक पत्र आलं.

"अम्मा, नमस्कार देव दयेनें मी खुशाल आहे तूं आणि देवानय् मजेंत आहां ना? खरं सांगूं, मला हें गिरणीतलं काम आवडत नाहीं हातमागावर मी काम करीत होतों, त्या दिवसांची आठवण झाली, कीं माझे डोळे भरून येतात इथं काम करतांना माझं डोकं सैरभैर होतं माझा कोंडमारा होतोय. गांव सोडून मी इथं कशाला आलों, असं मला वाटतं. हं, कुणाकडून तरी पत्र लिहून, तुमची खुशाली मला कळव."

× × ×

देवानय् ज्या दोन घरी काम करीत होती, त्यापैकी एक सेवानिवृत्त अधिकारी होता. त्याची बायको तशी स्वभावानं चांगली होती. गोड बोलून, मोलकरणीकडून जादा काम करून घेण्यात, ती तरबेज होती देवानयशीं ती प्रेमळपणे वागे. आपले जुनेपाने कपडे नि शिळे नि उरलेलं अन्न ती देवानयला नेहमींच देत असे पण हें सुखदेखील दैवाला पाहवलं नाहीं त्या घरी, एक तरुण आचारी नोकरीला होता त्याची बुभुक्षित नजर देवानयकडे गेली

पण देवानयला तें सहन झालं नाही तिने ह्या घरची नोकरी सोडण्याचा आपला मनोदय आईला सांगितला. पण आईला सारी हकीगत सांगणं तिला भाग पडलं 'मालकीणीकडे तक्रार करूं' या आईच्या सुचनेला तिचा विरोध होता नोकरी सोडण्याचा तिनें निश्चयच केला

पण दुसरं काम मिळणं तितकंस सुलभ नव्हतं. दोन महिन्यानंतर तिला दुसऱ्या घरीं काम मिळालं

* * *

सहा महिने असेच निघून गेले. बंगलोरला ज्या गिरणींत वैयापुरी कामाला होता, त्या गिरणीतल्या कामगारानीं संप केला सभा नि व्याख्यानं यांची धुमश्चक्री सुरूं झाली वैयापुरीला संपात सामील होणं भाग पडलं.

एक महिना उलटला कित्येक सभा भरल्या नि विसर्जन पावल्या. सुरवातीला कामगार आनंदांत होते. संपाच्या यशस्वितेचा कैफ त्याना चढला होता. पण तो कैफ आतां उतरला होता पैशाची चणचण भासूं लागली. पोटं रिकामी राहूं लागली.

सरकारनें मध्यस्ती केली. संप मागें घेण्यांत आला कामगार कामावर रुजू झाले. पण पंचविस कामगारांना बडतर्फीच्या नोटीसा मिळाल्या. वैयापुरी त्यांतला एक होता.

वैयापुरी आपल्या वरिष्ठांना भेटला. पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. उलट त्याच्या शिक्षणामुळें कामगाराना चिथावल्याचा आरोप मात्र त्याच्या माथीं मारला गेला.

बेकार वैयापुरी बंगलोरच्या रस्त्यावर भटकत राहिला आपल्या मित्रांच्या बरोबर, नोकरी शोधण्यासाठीं तो मद्रासला गेला. आठ दहा दिवसाच्या खटपटी-नंतर, एका गिरणींत त्याला काम मिळाले. पण त्याकरतां पांच रुपयांची लांच त्याला द्यावी लागलीच, आणि हे पैसे कर्जाऊच घ्यावे लागले

वैयापुरी आतां संपूर्ण बदलला होता आपला मनस्ताप नि दु ख विसरण्या-करतां तो आतां पिऊं लागला पैशाच्या हव्यासामुळें जुगार खेळूं लागला आपल्या म्हाताऱ्या आईला पैसे पाठविण्याऐवजीं, तो, ते पैसे व्यसनांत उधळू लागला.

मिळणारे पैसे आपल्याला पुरत नाहींत म्हणून पैसे तूर्त पाठवितां येत नाहीं. असंच त्यानें आपल्या आईला कळविलं, आणि जर देवानय् मद्रासला येत असेल, तर तिलाही गिरणींत काम मिळूं शकेल, अशी पुस्ती त्या पत्राला त्यानें जोडली.

हें पत्र वाचून पळमीअम्मालला दु:ख झालं, वाईट वाटलं. जास्त पैसे मिळतील, या आशेनें देवानयही मद्रासला जाण्यास तयार झाली. मद्रासला स्त्रिया गिरणींत नोकरी करतात, ही गोष्ट तिला ऐकून माहित होती.

पण म्हातारीची या गोष्टीला संमती नव्हती आपल्या तरुण मुलीनें, गिर-णीसारख्या चव्हाट्याच्या ठिकाणीं नोकरी करूं नये असं तिला वाटत होतं. पण देवानयनें तिची कशीबशी समजूत घातली. नाईलाजानं म्हातारीनें संमती दिली. देवानयच्या कानातली कुडी विकून तिच्या प्रवासाच्या खर्चाची सोय केली.

  

लिहिल्याप्रमाणें वैयापुरीनें, तिला गिरणींत काम मिळवून दिले. ज्या गिरणींत वैयापुरी काम करीत होता, ती ही गिरण नव्हती. ही दुसरीच होती या गिरणींत जवळ जवळ दिडशें स्त्रिया कामाला होत्या. दर दहा स्त्रियांवर एक पुरुष मुकादम होता.

तिचा जॉबर सुरवातीला तिच्याशीं अत्यंत प्रेमळपणें वागला. पण नंतर त्याच्या वागणूकींत कडकपणा डोकावू लागला. कधींमधीं तो तिच्याशीं गप्पागोष्टी करण्याचा प्रयत्नही करूं लागला.

त्याच्या वागणूकींत होत असलेल्या या फरकानें देवानय् गोंधळून गेली. एक दिवशीं तिनें आपल्या शेजारणीला सारी हकीगत सागून, तिचा सल्ला विचारला. तिची शेजारीण हंसतच म्हणाली, "तूं अजून नवी आहेस पण एक गोष्ट लक्षात ठेव, तूं त्यांच्याजवळ बोलल्या चालल्याशिवाय, त्याला खूष ठेवल्याशिवाय तुझा निभाव लागणं कठीण नाहींतर तुझा अर्धा पगार दंडापोटींच जमा व्हायचा पण जर तो खूष असेल, तर पगार वाढही झटकन् होईल."

पण गरीबांच्या दुःखाची कुणास कल्पना असते? जिथं स्वाभिमान तुडविला जातो, अशा ठिकाणीं असहाय्य परिस्थितीमुळें, त्या निष्पाप पोरीला येणं भाग पडल. देवानयूला हें सहन करणं भागच होतं प्रामाणिकपणा, सरळपणा, शुद्ध चारित्र्य, देव इत्यादि गोष्टींवरील तिचा विश्वास उडाला.

जॉबरच्या आवाजात आता मार्दव आलं होतं. देवानयूनें त्याला अप्रत्यक्ष-रित्या कबूली दिली तिनें त्याचा कधी प्रतिकारही केला नाहीं हळूं हळूं ती त्याच्याशीं मोकळेपणानें बोलूं लागली तोही सहास्य मुद्रेनं तिच्याकडे पाहूं लागला. तिलाही आता त्यात समाधान वाटूं लागलं. तिचा पगार वाढला.

काहीं महिने असे गेले आता तिला मळमळायला लागलं. आपल्याला दिवस गेलेत, असं तिला वाटूं लागलं. लज्जेमुळें नि दुष्कीर्तीच्या भयानें तिनें ही गोष्ट छपवून ठेवली. तिच्या सहकारी स्त्रिया तिच्या अज्ञानाला हंसत होत्या.

एकदां तिला वाटलं कीं घरीं जावं. पण तिला आपल्या समाजाची भीति वाटत होती. आपल्याला ते बहिस्कृत करतील. हा कलंक, आपल्या आईलादेखील सहन होणार नाहीं, हें तिला माहित होतं. म्हणूनच घरीं जाण्याचा विचार तिनें निकालांत काढला. काय करावं हें तिला समजत नव्हतं, म्हणून ती स्वस्थ राहिली होती.

पण एक दिवशीं तिला प्रसंगाचं गांभीर्य कळून चुकलं. ती घाबरून गेली. आपल्या मैत्रिणीच्या खांद्यावर डोकं टेकून ती अश्रू ढाळूं लागली. तिनें कांहींतरी ' औषध ' घेऊन मोकळं होण्याचा सल्ला दिला. त्या कल्पनेनं तिच्या अंगांवर शहारे आले.

दोन रुपये घेऊन, अशा फसलेल्या बायकांची मुक्तता करणाऱ्या एका वृद्धेची तिला माहिती होती. पण तिच्याजवळ दोन रुपयेही नव्हते. तिला वाटलं, सेलम सोडून कशाला इथं आलों. तिथंच भूकेनें नि उपासमारीनें मरण आलं असतं तर ही दुष्कीर्ति, हा कलंक लागला नसता.

काही दिवसानी तिच्या एका मैत्रिणीनें तिला गर्भ न पाडण्याचा सल्ला दिला. ते पाप करूं नकोस, असं बजावलं; आणि तिला एका वृद्धेचा पत्ता दिला.

देवायन् त्या ठिकाणीं गेली दोन तीन महिन्यानीं ती प्रसूत झाली मुलाला पाहाताच ती सारे क्लेश, मनस्ताप, नि काळज्या विसरून गेली. जगाचादेखील तिला विसर पडला. मातृत्वाच्या आनंदानें तिचा उर भरून आला. त्या आनंदात तिला जगाच्या दुष्टपणाचीही विस्मृती झाली. मुलाचं कोडकौतुक करण्यातच तिचा सारा काळ खर्च होऊं लागला. याचा घात करण्याचा, आपण एकदा विचार करीत होतों, याची तिला आठवण पडे, नि तिचे डोळे पाणावत.

ती वृद्धा तिची देवभाल प्रेमळपणे करीत होती " खा, पी नि मजेत रहा कशाचीही चिंता करूं नकोस " असं देवायन्ला नेहमी सांगे.

पण लवकरच त्या वृद्धेचं सत्यस्वरूप तिच्या लक्षात आलं फसलेल्या बायांना आधार देऊन, त्याना वाममार्गाला लावणारी ती एक कुंटीण होती.

देवानय् गिरणींत पुन्हां कामाला गेलीच नाहीं

\+ + +

" सेलमला आपल्याकडे एक मोलकरीण होती आठवतं तुला ? ती कालची भिकारीण, त्या देवानय् सारखीच दिसत होती. " रामनाथ अय्यर आपल्या पत्नीला म्हणाले.

सेलमला ज्या सेवानिवृत्त अधिकाऱ्याच्या घरीं देवानय् काम करीत होती, त्याचा रामनाथ अय्यर हा मोठा मुलगा. रामनाथ अय्यर, बँकेत नोकरीला होते.

"सेलममधली मुलगी मद्रासला कशाला येईल ? काय विक्षिप्त कल्पना आहे. तुमची !" सीतालक्ष्मीने उत्तर दिलें.

"कोणी असो बिचारी ! तान्हं पोर कमरेवर घेऊन त्या गरीब पोरीला भीक मागण्याची वेळ यावी, इतका का आपला देश दरिद्री झालाय ! किती लाजिरवाणं आहे हें !" रामनाथ गदगदून म्हणाले.

"तुम्हांला फारच देशाची काळजी पडलेय ज्यानं त्यानं आपलं घर संभाळाव म्हणजे झालं." सीतालक्ष्मीनीं नेहमीच्या त्राग्याने उत्तर दिले,

दुसऱ्या दिवशींदेखील त्या भिकारणीचा चेहरा रामनाथ अय्यरच्यासमोर तरळत होता. ऑफीममधून ते तडक चायनाबझारकडे गेले. त्याच उपहारगृहासमोर त्यानीं आपली गाडी उभी केली; नि आजूबाजूच्या भिकाऱ्याचे चेहरे न्याहाळावयास सुरवात केली. पण त्याना हवा असलेला चेहरा त्यांत दिसला नाहीं.

शनिवारी ते सपत्निक चायनाबझारला गेले होते सीतालक्ष्मी त्यांना डिवचित म्हणाली, "ती पहा, ती भिकारीण."

आपल्या तान्ह्या मुलाला कमरेवर घेऊन, ती एका धांवत्या मोटारीबरोबर, भीक मिळण्याच्या आशेनें धावत होती तेव्हढ्यात तिचं लक्ष रामनाथ अय्यरच्या गाडीकडे गेलं पण त्या गाडीकडे ती धावली नाहीं. मागें झालेली निराशा ती विसरली नव्हती. गरीबांनादेखील मनुष्य स्वभावाची पारख असतेच.

तिला हाक मारून बोलवावी, असं रामनाथ अय्यरना वाटत होतं. पण त्याना तसं करण्याचा धीर होत नव्हता. त्याची प्रतिष्ठा मधें येत होती. ती आपल्या गाडीजवळ येईल, असं त्याना वाटत होत. पण ती गर्दीत दिसेनाशी झाली.

निराशेनें त्यांनीं गाडी सुरूं करण्यास सांगितलें. त्या भिकारणीचा चेहरा रामनाथ अय्यरच्या समोरून हलत नव्हता छायेसारखा तो त्यांचा पाठलाग करीत होता. एकादी तरुण भिकारीण दिसली, कीं आशेनें ते थांबत. पण त्यांच्या वांट्याला निराशाच येई.

स्वप्नांतदेखील ती त्यांचा पाठपुरावा करी. स्वप्नांत ती आल्यावर ते म्हणत, "तूं सेलमची ना ? देवानय् तुझं नाव ना ? चल माझ्याबरोबर गाडींत" ते तिला गाडींत बसवून घरीं आणत. तिला पाहताच सीतालक्ष्मी कडाडत, " त्या बाजारबसवीला इथं कशाला आणलीत. ? "

" असुं दे ग तिला इथं " ते अजीजीनं म्हणत. " छान, छान. " त्याना वेडावत सीतालक्ष्मी गर्जत असे, " या बाजारबसवीला मी घरात घेऊं ! चल, निघ इथून. चालती हो, "

" अम्मा, मी चोरी करणार नाहीं मी तुमचं ऐकेन पण माझ्या छकुल्यासाठीं तरी मला राहू द्या. " अश्रूपूर्ण नेत्रांनीं ती विनवित असे

" चल निघ " सीतालक्ष्मीचा आवाज कडाडे, नि रामनाथ अय्यरचं स्वप्न भंग पावे

कित्येक दिवस ते तिच्यासाठीं भटकत होते चित्रमंदीरं, रंगमंदीरं, बाजार, स्टेशन सारे चव्हाटे त्यानीं पालथे घातले पण ती त्याना पुन्हा दिसली नाहीं

कुठं गेली देवानय्? खरंच कुठं गेली ? कोण देणार या प्रश्नाचं उत्तर ?

— × —

# वादळ

मुंबई–पुणें रस्त्यावर तो वाडा होता. वाडा कसला, एका पुरातन पडक्या वाड्याचे ते भग्नावषेश होते. छप्पर नि वरचा मजला केव्हांच जमिनदोस्त झाली होती. भिंती स्थानभ्रष्ट झालेल्या होत्या. चौथरा मात्र अजूनही कायम होता. त्या चौथऱ्यावर चुकून माकून उभी राहिलेली एकाद दुसरी भिंत, उन्हापावसाचा मारा खाऊन आतां अगदी काळवंडून गेली होतीं. त्या काळ्या भिंती, नि भिंतींच्या वेड्यावांकड्या छाया, त्या भयाण वाड्याच्या भीषणतेंत अधिकच भर घालित होत्या. त्या जीर्ण वास्तूच्या संरक्षणार्थ, उभीं ठाकलेली, मुळपुरुषांचीं जणूं काय भूतंच होतीं ती.

वाड्याच्या समोर, त्या वाड्याइतकीच जुनी आमराई होती. जवळूनच इंद्रप्रभेचा प्रवाह शातपणें वहात होता.

'भूताटकीचा वाडा' म्हणूनच तो प्रसिद्ध होता. त्या वाड्याकडे कुणीही फिरकत नसे. दगड-वीटांची जरूरी भासली, तर एकादा गांवकरी तिकडे जाई येव्हढंच पण गांवदेखील जवळ नव्हतं. चांदगांव त्या वाड्यापासून जवळ जवळ तीन मैल होतं. चांदगांवची अति उत्साही पोरं त्या बाजूला फिरकत. नाहीं असं नाहीं. पण त्या पडक्या वाड्यापेक्षां, समोरची गर्द आमराईच त्यांना मोहिनी घालीत असे.

त्या पडक्या वाड्याचं स्वरुप पालटून टाकलं आबा चव्हाणांनीं. पूर्वी आबा चव्हाण पोलिसांत होते. सेवानिवृत्त झाल्यावर काय करावयाचं हा त्याच्या पुढे प्रश्न पडला. घरीं स्वस्थ माशा मारीत बसणं त्यांच्या सारख्या शिपाई गड्याला मानवणारं नव्हतं. मिळणाऱ्या पेन्शनमध्यें त्यांचा चरितार्थ चालण सहज शक्य होतं, इन मिन दोन माणसं. ते नि त्यांची लेक शेवंती. दोघाना असा किती खर्च लागणार! वडिलार्जित वस्तु संभाळित, हरी हरी म्हणत स्वस्थ पडायला कांहींच हरकत नव्हती.

पण स्वस्थ बसण म्हाताऱ्याला पटत नव्हतं. हडेल हप्पी करण्यात त्याचं सारं आयुष्य गेलेलं. त्याना हें असं निमूट बसणं कसं आवडणार? काम करावयाची अजूनही त्यांच्या अंगीं धमक होती तशी त्यांची शरीरयष्टी अजूनही खणखणीत होती भरदार मिशाचा ऐटदार ताठरपणा अजूनही कायम होता. त्यांचा काळेपणा आता करडेपणाला जागा देत होता एवढंच टोपीची तिरकस ठेवण, हातातला सोटा नि पायांतल्या जाड पोलीसी वहाणा अजूनही पूर्वींच्याच वैभवानें नि दिमाखानें मिरवित होत्या

म्हाताऱ्याच्या मागे दुसरी कसलीच भगभग नव्हती. नाहीं म्हणायला शेवंतीचं लग्न, हा एकच प्रश्न त्याना अस्वस्थ करणारा होता. तिला केव्हां हळद लागते याचीच विवचना त्याना होती. शेवंतीवर आबाचा फार जीव होता तिला दूर लोटण्याची त्याची तयारी नव्हती. म्हणूनच एकादा होतकरु तरुण पकडून त्याला घरजांवईच करण्याचा त्यांचा मनसुबा होता तसं नसतं तर शेवंतीचं लग्न केव्हांच झालं असतं.

चादगांवच्या मानानें शेवतीनें लग्नाचं वय केव्हाच ओलांडलं होतं. तिच्या वयाच्या मुली आता लेकुरवाळ्या म्हणून मिरवित होत्या. पण शेवंतीचा करा अजूनही फुटावयाचा होता. एकविसावं असुन तिला आतां बाविसावं लागलं होतं. घरात बाईमाणूस नसल्यामुळें आबाच्या मागें भूणभूण लावणारं कोणीच नव्हतं; नि आबांना शेवंती अजून लहानच वाटे.

शेवताकरतां जीव पाखडणारे वीर चांदगांवांत नव्हते. असं नाहीं. पण शेवंती म्हणजे बिजली होती नुसती. हरिणीसारख्या काळ्याभोर डोळ्यांची शेवंती

हरिणीसारखीच चपल होती. रस्त्यानें जातांना तुर्तुर् करीत, ती अशा सफाईनें जाई, कीं पाहाणाराला लखकन् वीज चमकल्याचा भास होई तितक्याच चपळाईनें ती इंद्रप्रभेमध्यें पोहत असे.

आबांप्रमाणेंच शेवंतीदेखील अंगापिंडानें मजबूत होती तिचा गोरेपणा उघड्या हवेंत कामं करण्यानें थोडासा ताबूसला होता नाक तलवारीसारखं धारदार होतं काजळी डोळ्यातली चमक, इंद्रसभेंत विहार करणाऱ्या माशाची आठवण करून देत असे शेवंती म्हणजे एक ढंगदार लावणी होती.

पण गावातल्या तरुणाचे नि वृद्धांचेही हें दृष्टिसुख त्याना दुरावलं

त्या पडक्या वाड्यातील उभ्या असलेल्या भिंतीचा आधार घेऊन, आबांनीं तिथ एक झोंपडी उठवून दिली त्या वाड्याचा रस्त्यालगतचा भाग साधारण शाबूत होता. त्याच भागाच्या आबानीं उपयोग केला, नि तिथें आबांचं " गोपालकृष्ण क्षुधा शाति भूवन " सुरू झालं.

आबा तसे फार मेहनती होते. त्या पडक्या वाड्याचा ओसाडपणा त्यांनीं हां हा म्हणतां नाहींसा केला.

आबाच्या हॉटेलची जागा तशी मोठी नव्हती. एका लांब रुंचक खोलींत, दोन चार टेबलं नि खुर्च्या, नि बरेचसे बाकडे टाकलेले होते बाजूच्या खोलींचा स्वयंपाकघरासारखा उपयोग होत असे बाहेर गुरांचा गोठा होता वाड्यांतल्या जुन्या तक्तपोशीचा उपयोग करून, त्यानीं एक पोटमाळा तयार करून घेतला होता. पैसा अडका इत्यादि मौल्यवान् जिन्नस तिथें बंदिस्त ठेवले जात. तीच शेवंतीची बसण्या निजण्याची जागा झाली.

झोंपडीबाहेर त्यांनीं बाकडी टाकली; नि मधून मधून फुलझाडांच्या कुंड्याही ठेवल्या.

लिमज्या नि चहा यांनीं सुरवात झालेलं आबांचं 'क्षुधा शांति भूवन' लवकरच भरभराटीस लागलं. सोडा, लेमन रासबेरीच्या रंगी बेरगी बाटल्या तिथं दिसूं लागल्या. लाल धागा मागें पडला. पिवळा हत्ती, बर्कले नि कॅप्स्टन् त्या जागीं आलीं. शोभेची कपाटं आली. आरसे आले. भजी, पाव बिस्किटं यांची रास पडूं लागली.

सर्विसची मोटार आबांच्या हॉटेलजवळ थांबल्याशिवाय पुढं जाऊंच शकत नसे. लढाईमुळें वर्दळ जास्त वाढली. त्या मानानें आबांची थैली फुगत चालली.

आबा दिवसेंदिवस तरुण होत चालले. व्यापार वाढत होता. नोकर चाकर वाढत होते; नि त्याच प्रमाणांत आबांचा उत्साहही वाढत होता.

कामानिमित्त आबांना वरचेवर बाहेर जावं लागे. अशावेळीं हॉटेलची सारी व्यवस्था पाहणं शेवंतीला भाग पडत असे. तीही आंता त्यांत तरबेज झाली होती. चादगांवचा बुजरेपणा चादगांवांत राहिला. चांदगांवांतली अबोल शेवंती, नि गल्ल्यावर बसून हुकूम सोडणारी शेवंती यांत जमीन–अस्मानाचा फरक पडला होता.

आपल्या लेकीच्या कर्तृत्वाचा आबांना अभिमान वाटे. मुलांसारखी ते तिला वागवित. पण त्याचमुळें शेवंतीचं लग्न ही एक कष्टसाध्य गोष्ट झाली होती. चादगावांतले तरुण तिच्या नि आबाच्या दृष्टीनं विचार करण्याजोगे राहिलेले नव्हते. नि हे असलं जड मोती पत्करायला त्याचीही तयारी नव्हती.

स्वतंत्रतेचं पाणी चाखलेली शेवंती, लग्नबंधनानीं जखडून जाण्यास नाखूष होती. अधिकार गाजविण्याची तिला आता संवय झाली होती दुसऱ्याचा अधिकार मानणं तिला जड वाटलं असतं. तुल्यबल जोडीदार तिला पाहिजे होता; नि तसा मिळणं चादगांवांततरी शक्य नव्हतं.

तिच्याभोंवती फिरणाऱ्या आशाळभूतांची निराशा झाली. पण अवमानित झालेले ते जीव स्वस्थ नव्हते. त्याच्या लवलवणाऱ्या जिभा, शेवंतीबद्दल खऱ्या खोट्या कंड्या उठविण्यांत गर्क झाल्या होत्या. कारण नसतां शेवंती बदनाम होत होती.

आबांना हें समजत नव्हतं अशांतला भाग नाहीं. त्यांना प्रत्येक गोष्ट समजत होती. पण आबा त्याबद्दल उदासीनता दाखवित. खरं म्हटलं तर आबाना असल्या क्षुल्लक गोष्टीवर विचार करण्याइतका वेळ नव्हता. आबा पैशाच्या आवाजानें नादावले होते. तो पडका वाडा विकत घेऊन, तिथं नवीन वाडा उठविण्याचा स्वप्नात ते दंग होते.

अधिकाराची चटक लागलेली शेवंती, या कंड्याकडे लक्ष देण्यास तयार नव्हती. किंबहुना अशा कंड्या जास्त प्रमाणांत उठल्या जाव्यात, असंच वर्तन

ती जाणून बूजून करीत असे. अधिकाराचा कैफ तिला चढला होता. त्या उन्मादात जग ठोकरीनं उडवून देण्याची दिवास्वप्नं तीही रगवित होती.

× × × ×

चादगावातील इतर लोकापेक्षा आबा माझी विशेष अगत्यानं विचारपूस करीत. कदाचित् माझ्या शिक्षणाचा हा प्रभाव असेल. पण ही गोष्ट सत्य होती, हें निर्विवाद.

तालुका कॉंग्रेस कमिटीतर्फे जें कार्यकर्ते खेडोपाडी कार्य करीत होते, त्यातला मी एक होतों खादी, चरका, साक्षरता, शेती सुधारणा इत्यादि अनेक विषयाचं मार्गदर्शन आम्हाला करावं लागत होतं.

आबाइतकीच शेवतीचीही माया माझ्या वांट्यास आलेली होती बाप नि लेक सारख्याच आपुलकीनं माझी चौकशी करीत.

आठवड्यातून एक दोन खेपा तरी माझ्या होत. वर्तमानपत्राकरतां मी या खेपा घालीत असे. चादगावात केसरी व्यतिरिक्त इतर वर्तमानपत्र मिळणं मुष्कील होतं गिऱ्हाईकाकरितां आबा बरीचशीं वर्तमानपत्रं विकत घेत माझ्याकरता ते ती आस्थेवाईकपणे ठेऊन देत.

अधाशासारखा मी त्या वर्तमानपत्रावर तुटून पडत असे. फार वेळ झाला, वा रात्र अंधारीं असली, तर मी मुक्कामही ठोकीत असे.

रिकाम्या वेळीं आबा गोष्टीवेल्हाळ होते. आपल्या पोलिसी आयुष्यातल्या दिलचस्प कथा सागताना ते नेहमीच रंगून जात. रात्रीच्या नीरव शाततेंत शेवतीनें नि मी, त्याच त्याच, कथा कितिकदातरी ऐकल्या होत्या. गप्पाच्या ओघांत मी शेवतीबरोबर लग्न करावं, असं आबानीं एक दोनदां मला सुचविलं होतं, पण आबाच्या त्या सूचनेकडे मी लक्षच दिले नाहीं. किंबहुना त्या सूचनेवर मी विचारच केला नव्हता. मी ज्या विशिष्ट वैचारिकेनें वागत होतो, त्यामध्यें असल्या प्रश्नांना स्थान नव्हतं.

ब्रह्मचर्याची मी शपथ घेतली होती. धोंडोगुरुजींच्या आश्रमांत माझा बराचसा काल गेलेला होता. लोकसेवेची दीक्षा मला तिथंच मिळाली. आजन्म अविवाहित राहण्याचा संकल्प त्याचवेळीं सोडला होता.

त्यावेळीं तरी आपण एक मोठं शतकृत्य केलं असा अभिमान मला वाटला होता सामान्यापेक्षा आपण कोणीतरी विशेष आहोंत, अशी जाणीव मला होत होती पण त्यावेळी मी अजाण होतों.

× × ×

धोंडो गुरुजी तसे निर्लेप चारित्र्याचें होते त्याची वागणूक संशयास्पद नव्हती. सागण नि वागणं यात फरक नव्हता जो उपदेश ते आपल्या शिष्याना करीत, तो ते स्वत आचरणात आणीत असत आमच्याबरोबर रस्ता-सफाअीला येण्यात त्याना कमीपणा वाटत नसे. हातात झाडू घेऊन ते आमच्या पुढं असत सूत कातण्याचा त्याचा वेग कौतुकास्पद होता.

धोंडो गुरुजींची साठी उलटून गेली होती. पण नियमित आहार नि व्यायाम यायोगें त्याची प्रकृति अजूनही खणखणीत होती

धोंडो गुरुजींची वाणी अत्यंत मिठ्ठास होती. ते बोलूं लागले कीं अैकणाराची सारासार विचारबुद्धि कुंठित होत असे तो गुरुजींच्या विचार धारेबरोबर वाहू लागे नादलुब्धासारखा तो डोलूं लागे

शिस्तभंग हा गुरुजींच्या हिशोबीं अक्षम्य गुन्हा होता. ते जितके प्रेमळ होते, तितकेच कठोर होते शिस्तभंग करणाराची ते गय कधींच करीत नसत. आपल्या वैचारिकेत कांहीं चूक आहे, तसं त्याना कधीच वाटलं नाहीं. कुणी तशी दाखवून देण्याचं धाडस केलंच, तर शिस्तभंगाच्या नावाखालीं त्याला त्याचं शासन भोगावं लागे. स्तुति त्याना प्रिय नव्हती हें खरं, पण विधायक टीकाही त्याना सहन होत नसे.

त्या वादळी रात्रीं घडलेल्या घटनेनं माझ्या विचार चक्राला गति मिळाली ज्या मूल्यावर माझी श्रद्धा होती. जी तत्त्वं मला मोहानिय वाटत होती, त्या साऱ्याच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडाल्या.

ती रात्र मी कधींच विसरणार नाहीं. त्या रात्रीची आठवण पडतांच, तो सारा देखावा माझ्या डोळ्यांसमोर नाचूं लागतो. साऱ्या प्रसंगाचा चित्रपट डोळ्या-पुढें सरकूं लागतो. भिरभिर वाटणारा वारा, काळ्याकभिन्न मेघानीं ढगाळून गेलेलं आकाश, विद्युल्लतेचं तांडव नृत्य, तो पडका वाडा, नि ती रुपगर्विता शेवंती.

पंच महाभूतांतली दोन भूतं पृथ्वीवर थैमान घालीत होती. जणूं काय धरित्रीला कुठंतरी दूर भिरकावून देण्याचा त्याचा प्रयत्न चालला होता. बाहेर हा सग्राम चालू होता, नि त्या पडक्या वाड्यातल्या एका अरुंद खोलीत मी निसर्गाशीं झुजत होतों.

त्या रात्रीं माझ्या हातून जें घडलं, तें योग्य होतं की अयोग्य होतं, याचा उलगडा मला अजूनही झालेला नाहीं. पण नैसर्गिक शक्तीला तोंड देणं मानवाच्या आवाक्याबाहेरचं असतं, ही गोष्ट मला कळून चुकली नैसर्गिक प्रवृत्तींना अवरोध करणं, ही आत्मवंचना आहे, भ्याडपणा आहे. असं आज मला वाटतं

मी जें केलं त्यांत अपौरुषेय असं कांहींच नव्हतं पण ज्या तत्त्वप्रणाली प्रमाणे मी वागत आलों, ती तत्त्वप्रणाली चुकीची होती, ज्या माणसाला मी गुरू म्हणून पूजीत होतों, त्याला निसर्गाचे साधे पाठही माहित नव्हते, याची जाणीव मला त्या रात्रीं झाली. या नव्या जाणीवेनें मी हादरून गेलों.

निसर्गाच्या विरुद्ध लढा उभारून खरं सुख मिळण अशक्य आहे नैसर्गिक प्रवृत्तींना पायबंद न घालता इच्छापूर्ती करणं यांतच खरं सुख आहे, समाधान आहे

माझ्या मनावर जे संस्कार झाले होते त्या संस्काराना त्या रात्रीं एक जबरदस्त टोला बसला. माझा विश्वास डळमळूं लागला तरीदेखील माझ्यावर झालेले संस्कार असे सहजासहजीं पुसून जाऊं शकत नाहींत. त्याचमुळें त्या वादळी रात्रीं, माझ्या हातून जें घडलं, त्यानें माझ्या मनांत वादळ उत्पन्न झालं आहे. तें वादळ अजूनही शात झालेलं नाहीं.

भूक लागली असता जेवण हा अपराध नाहीं. माझं मन शरमतं येवढ्याच-साठीं कीं मी उपवास करण्याचं वचन दिलं होतं म्हणून.

पण ज्या वेळीं मी वचन दिलं होतं, त्या वेळीं मी अजाण होतों. निसर्गाच्या शक्तीची मला कल्पना नव्हती. सुखदायी वायु-वीची मला माहीत होत्या. वादळी झंझावात मला अपरिचित होता. ढगांत नर्तन करणारी बिजली मी पाहिलेली होती, पण आकाश फोडून पृथ्वी दुभंगण्याकरतां खालीं धाव घेणारी विद्युल्लता माझ्या नजरेस पडलेली नव्हती.

म्हणूनच निसर्गाच्या उन्मादी स्वरुपानं मी बावचळून गेलों, भांबाऊन गेलों.

माझ्या प्रतिस्पर्ध्यांच्या विराट स्वरुपापुढें मला माघार घ्यावी लागली. विवेकाचे बांध फोडून, विकार उफाळून बाहेर पडले.

माझ्या हातून जें घडलं, तें पाप नव्हतं. तो आविचार असेल, अविवेक असूं शकेल. पण तें पाप नव्हतं. पृथ्वीच्या पोटांत साचलेली उष्णता भूकंपाच्या नाहीं-तर ज्वालामुखीच्या मार्गानं बाहेर पडते. त्या उद्रेकानं जग हादरतं. मीही तसाच हादरला गेलों आहे

मी निसर्गाशीं प्रतारणा केली होती. नैसर्गिक वासना मी दडपून टाकण्याचा प्रयत्न करीत होतो. पण त्या रात्रीं त्या उफाळून वर आल्या निसर्गानें आपला सूड पुरेपूर उगवून घेतला.

पण हा माझा दोष नव्हता. माझी दिशाभूल करण्यात आली होती. निसर्ग-शक्तीपुढे मानवी सामर्थ्य क.पदार्थ आहे, हें सत्य माझ्यापासून लपवून ठेवलं होतं. नैष्टिक ब्रह्मचर्य नि संयम याचं अवास्तव अवडंबर, धोंडो गुरुजींनीं आश्रमांत माजवल होतं. पण हें करताना जाणून बुजून निसर्गाकडे काण।डोळा केला होता.

माझ्या डोक्यांत आज अराजक गाजलं आहे मी बेफाम होत चाललों आहे. जग लाथेच्या ठोकरीनं उडवून द्यावसं वाटतं मला.

बदनाम झालेला देशभक्त आहे मी. देशसेवा करीत असताना, मी माझ्या शरीराच्या गरजांकडे दुर्लक्ष केलं नाहीं, माझ्या वासनांचे चोज मी पुरवित बसलों, असा गुरुजींचा दावा आहे. "वेश्येच्या नादीं लागलेला" अशी आज माझी ते संभावना करतात.

पण शेवंती वेश्या नव्हती नि आजही नाही ती बदनाम झालेली आहे, ही गोष्ट मला माहीत होती. तो दोष तिचा नव्हता. तिच्याभोंवतीं जिभा चाटीत गोंडा फिरविणाऱ्या गांवगुंडांचा होता. ती त्याना दुर्लभा होती म्हणूनच तिचा सूड घेण्यासाठीं, त्यानी पद्धतशीरपणें तिला बदनाम करण्याचा यशस्वी कट रचला.

देशभक्तांचं चारित्र्य निष्कलंक असलं पाहिजे, हे तत्त्व मला मान्य आहे. मी स्वतः निष्कलंक आहे, असं अजूनही मला वाटतं. शेवंतीचे नि माझे संबंध चोरटे नव्हते. त्यांत गुप्तता नव्हती. ती मला हवी होती. ती माझी होती.

पण घोंडो गुरुजींना हा संबंध मान्य नव्हता. त्यांच्या उपदेशाची ही उघड उघड पायमल्ली होती. ब्रह्मचर्यावरील ह्यांची व्याख्यानं ऐकूनही मी अधःपतित झालों होतों. हा त्यांचा उपमर्द होता; असं त्यांना वाटे. त्याना असं कां वाटावं हें मला समजत नव्हतं.

गुरुजी दुराग्रही होते निसर्गाचं श्रेष्ठत्व मान्य करावयाला ते तयार नव्हते. आपला पराजय कबूल करण्याइतका मोठेपणा त्याच्या अंगीं नव्हता.

माझी देशसेवा इथंच संपली, नव्हे संपवावी लागली

+ × ×

तो दिवस आजही मला आठवतो. माझ्या जीवनांतला क्रांतीकारक दिवस त्या दिवसाची विस्मृति होणं अशक्य आहे. त्या दिवसानें माझ्या साध्या नि सरळ जीवनात संघर्ष उत्पन्न झाला सरळ वाहणाऱ्या प्रवाहात भोंवरे निर्माण झाले आहेत.

शहरातलं माझं काम आटपायला त्या दिवशीं बराच वेळ लागला. चांद-गावला जाण्याकरता मी निघालों त्यावेळीं साडेपाच होऊन गेले होते. आकाश ढगाळलेलं होत हवेंत उष्णता होती पण पावसाला आताच सुरवात होईल असं काहीं वाटत नव्हतं.

जरा पाय उचलला पाहिजे, असं मनाशी म्हणत मी शहर सोडलं चांदगाव म्हणजे सहा मैलाचा रस्ता. बोलबोलता आपण चांदगांव गाठूं असा मला विश्वास होता. आज काहीं प्रथमच मी जात नव्हतो महिन्यातून दोन चार तरी खेपा होत असत माझ्या. रस्ता पायाखालचा होता. म्हणूनच मी जरा रमत गमत चाललों होतो. नि तशी जलदी जाण्याची निकडही माझ्यामागें नव्हती.

शहर सोडून मल दीड मैल मी गेलों असेन नसेन तोंच वादळानें पहिली सलामी दिली. भिरभिरणाऱ्या वाऱ्यानें वेग घेतला. धुळीचे नि पाल्यापाचोळ्याचे स्तंभ उभारले जाऊ लागले.

काळ्या मेघांच्या पार्श्वभूमीवर बिजलीचं नर्तन सुरू झालं मधून, मधून गडगडाटाचं संगीतही ऐकूं येऊं लागलं कोरड्या अंगानें चांदगांव गांठणं अशक्य आहे, हें मला समजून चुकलं.

मी पायांना गति दिली. पण माझ्यापेक्षा वादळाचा वेग जास्त होता दुसऱ्याच फर्लांगावर पावसाने मला गाठलं मुसळधार पावसाला सुरवात झाली

वाऱ्या–पावसाचा जोर वाढतच होता मी झोडपला जात होतो. देखता डोळा मोठमोठे वृक्ष उन्मळून कोसळत होते. त्याचमुळें अेकाद्या झाडाचा आधार घेण्याची भीति वाटत होती. निसर्गाच्या या थैमानी शक्तींना तोंड देत मी कसातरी चाललों होतो

नेहमींच्या वाटचालीचा रस्ता होता, तरी देखील मी अडखळत होतों. वाऱ्याचा जोर अितका होतां की सरळ चालण कठीण होतं.

मी भिजून चिंब झालों होतों कसातरी ठेचाळत, भिजत, धडपडत मी आबांच्या ' गोपालकृष्णांत ' येऊन पोंहोचलों

बाहेर दोन सर्विसच्या गाड्या पावसात उभ्या होत्या. त्यांतले उतारू आश्रया-करतां बहुधा आत गेले असावेत. कारण त्या रिकाम्या होत्या. हॉटेलचा दरवाजा आतून बंद होता मी दरवाजा ठोठावला.

नोकरानें दरवाजा किलकिला केला. मी तसाच आंत घुसलों; नि दरवाजा बंद केला.

ती मोठी खोली उतारूंनीं भरून गेली होती. मिळेल तिथं नि मिळेल तशी जागा पकडून ते बसले होते पाऊल ठेवायला जागा नव्हती, अितकी खेंचाखेंच झाली होती.

मी दरवाज्याजवळ उभा होतो. कपड्यातून पाणी निथळत होतं. माझं अंग गारठून गेलं होतं.

आबा कुठं दिसत नव्हते मी आबाची चौकशी करणार होतों, इतक्यात शेवंतीच पुढें आली. मला पाहतांच ती एकदम म्हणाली, "कोण तुम्ही ? असे उभे कां राहिलांत ? आंत या ना "

त्या स्वयंपाकवजा खोलींत मी शिरलों. एक शेगडी तिथं धगधगत होती. ती उष्णता मला सुखावह वाटली.

माझ्याजवळ येत शेवंती म्हणाली, "हें काय, तुमचे सारे कपडे भिजून चिंब झालेत काढा ते लवकर विनाकारण सर्दी व्हायची गणू जरा दूध गरम कर."

" पण माझ्याजवळ दुसरे कपडे नाहींत शेवंती. " मी तिच्याकडे पहात म्हटलं.

" अरे हो खरंच. पण थाबा, आबांचं धोतर देते मी तुम्हांला. या टॉवेलनं अंग कोरडं करा तोंपर्यंत. " असं म्हणत ती शिडीनें आपल्या खोलींत गेली.

तिची लगबग नि अगत्य पाहून मी स्वत शींच हंसलों खरंच का करावी तिनें येव्हढी धडपड ? मी ना तिच्या नात्याचा ना गोत्याचा. एक परिचित येव्हढचं, आमच्या परिचयाचं स्वरूप होतं. निदान मी तरी तसं मानत होतो. तिच्या मनाचा थाग मला लागणं शक्य नव्हतं. किंबहुना या वेगळे विचार, भावना तिच्या डोक्यांत घोळत असतील असं मला वाटतही नव्हतं

जितक्या चपळाईनं ती वर गेली, तितक्याच जलदीनें ती खाली आली. आबाच्या धोतराचा पिळा माझ्या हातीं देत ती म्हणाली, " धोतर बदला नि वर बसा. मी दूध नि फराळाचं घेऊन वर येतें "

" पण आबा कुठं दिसत नाहीत ते " मी तिला विचारलें

" आबा सकाळींच मुंबईला गेले आहेत. दोन दिवस ते तिकडे राहणार आहेत. "

तो खोलीवजा पोटमाळा मी आज प्रथमच पहात होतो. खोली कसली, चिंचोळ्या जागेचा एक अरुंदसा पट्टा होता तो. त्यांतला एक कोंपरा पेट्या नि ट्रंका यांनीं भरून गेला होता. बांबूच्या शिडीजवळ एक खिडकीवजा झरोका होता. त्याच्याजवळ एक आरसा नि शेवंतीची प्रसाधन-साधनं होती. तिचा बिछाना पसरलेला होता. उशालगत एक छोटा कंदील तेवत होता, नि उशीवर एक पुस्तक अर्धवट उघडें पडलेलं होतं.

दोन तीन माणस कशीबशी झोपूं शकतील येव्हढीच जागा होती तिथं. मी बराच थकलेला होतों. कंदीलाची वात जरा मोठी करीत, मी शेवंती वाचित असलेलं पुस्तक चाळण्यास सुरवात केली.

कादंबऱ्या, रहस्यकथा नि गोष्टी या व्यतिरिक्त आजच्या तरुणी दुसरं काय वाचणार ! या पलिकडे त्यांची मजल कधींच जात नाहीं. शास्त्रीय विषयांत त्याना गोडी नसते, चरित्रं त्यांना रुक्ष वाटतात, नि काव्य समजत नाहीं. वाङ्म

म्हणजे झोंप येण्याचं एक प्रभावी साधन येव्हढंच महत्त्व त्या वाचनाला देतात. सत्यदृष्टीपेक्षां कल्पना-सृष्टीच त्यांना मोहनिय वाटते. अभिजात संगीतापेक्षा उथळ भावगीतंच त्यांना जास्त प्रिय असतात. शेवंती त्याला अपवाद नव्हती. ती वाचित असलेलं पुस्तक म्हणजे प्रणयाची एक दर्दभरी कहाणी होती.

पुस्तक चाळतां चाळतांच हें माझ्या लक्षांत आल म्हणूनच पुस्तक तसंच उशीवर ठेऊन मी उठत होतों, तोंच शेवंतीचा पायरव मला ऐकूं आला.

वाफेभरला दूधाचा कप नि फराळाची बशी घेऊन ती वर येत होती

संकोचण्याचं मला काहींच कारण नव्हतं माझी भूकही चांगलीच चेतवली होती. नि संकोचपणें मी माझा फराळ संपविला.

आता फक्त पथारी पसरण्याचीच सोय पाहिजे होती पाऊस मुसळधार कोसळत होता वाऱ्याचा वेग अजूनही मंदावलेला नव्हता बिजलीचं नर्तन चालूंच होतं बाहेर काळाशार अंधार पसरलेला होता.

अशा परिस्थितीत चादगावला जाण शक्यच नव्हतं. तो विचार मूर्खपणाचा होता, नि शेवंतीने मला हा मूर्खपणा करूनही दिला नसता. खालची जागा माण-सानीं भरून गेली होती. तिथं पाय ठेवायला जागा नव्हती कुठं झोंपायचं ? खालच्या त्या गर्दीत जाण्याला मन धजत नव्हत. पण दुसरा मार्गच नव्हता. या जागेत तशी दोन माणस झोंपूं शकली असती. नाहीं असं नाही पण शेवती-सारख्या एका तरुणीच्या संगतींत ... ...

छे. तिला ते अवघडल्यासारखं झालं असतं त्या गर्दीतच कशी तरी टेका-यला जागा करायची असं ठरवून मी उठलों.

" कुठं निघालांत ? " तिने माझा हात धरीत म्हटलें

" खालीं जातो. झोंपायची सोय नको कां करायला ? "

" खालीं ? खाली मुंगीला शिरायला जागा नाहीं. "

" होय ते मला माहित आहे. पण त्यांत होईल कशी तरी जागा. नाहींतर दुसरी जागा आहे कुठं ? "

" कां, इथंच झोंपा ना. काय हरकत आहे ? " तिनें हंसत हंसत म्हटलें.

माझी हरकत नव्हती पण मला तें पटतही नव्हती मी विचार करीतच बसलों

" विचार कसला करतां ? " मला हलवित ती म्हणाली. " माझी भीति वाटते का ? "

तिचं हंसणं माझ्या जिव्हारी लागलं. तिच्या निकट स्पर्शानं माझं शरीर रोमांचित होत होतं तो स्पर्श सुखद होता, दाहक होता.

" हें पहा, मी तुम्हाला खाली जाऊं देणार नाहीं इथंच दुसरा बिछाना मी पसरते, त्यावर तुम्हीं झोंपा. मग तर झाल ना. " अत्यंत लाडिकपणें ती बोलत होती. त्या लाडिकपणानं मी विरघळलों.

झटपट तिनें दुसरा एक बिछाना तयार केला तिच्या नि माझ्या बिछान्यात फारसं अंतर नव्हतं

मी खूप थकलेला होतो बिछान्यावर अंग टाकून मी डोळे मिटून पडून राहिलों

" बत्ती मालवूं का ? " या तिच्या प्रश्नानं मला जाग आली. अंथरुणाला पाठ लागताच झोंप माझ्यावर अंमल गाजवूं लागली होती. तिच्या प्रश्नानं म्हणूनच मी दचकलों.

' काय म्हणालीस ? " मी उठत म्हटलं.

ती कंदीलाजवळ ओणवी होऊन तो फुंकण्याच्या तयारींत होती. तिनं अंगातलं पोलकं नि कांचोळी काढून टाकली होती. तिचे अनावृत्त उरोज मला स्पष्टपणें दिसत होते

त्या दृश्यानं मी एकदम शहारलों. माझी छाती धडधडूं लागली. रक्त मस्तकाकडे धाव घेऊं लागलं धाडकन् बिछान्यावर अंग टाकीत मी म्हणालों. " हं टाक फुंकून तो कंदील. "

माझी झोंप उडून गेली.

पाऊस कोसळतच होता. विजा चमकतच होत्या. झरोक्याला लावलेल्या कांचेमुळें विजेचा प्रकाशांत अस्तावस्त पडलेला शेवंतीचा सुडौल देह पाहून माझ्या अंगावर कांटा उभा राही.

काळोखांत कुणीतरी उठून बसल्याचा मला भास झाला. मी जागाच होतो माझी झोंप मघांच उडाली होती. छातीची धडधड अजून चालूच होती

कोण आहे ? मी विचारलें.

" कोणी नाही. मीच आहे. " शेवंतीनं उत्तर दिले.

" का ग उठलीस ? "

" काही नाही. इथं गळतेय. त्यामुळें झोंप येत नाही थोडासा बिछाना सरकवून घेतें झाल. "

चमकत्या बिजलीच्या प्रकाशांत, तिची अनावृत्त पाठ, नि एका बाजूच्या पुष्ट उरोजाचं मला दर्शन झालं. हवेंत गारठा असतानाही मला मनस्वी उकाड लागलं

ती मला अगदी खेटून झोंपली होती. तिच्या स्पर्शानं माझं अंग पुलकित होत होतं. तिचे उष्ण श्वास मला चाटून जात होते तिच्या उरोजाची ताठर टोकं माझ्या बाजूला बोंचत होती.

प्रतिकार करण्याची शक्तीच माझ्या अंगात राहिली नव्हती. छाती धडधडत होती रक्त आता डोळ्यांत उतरलं होतं. मस्तकाच्या शिरा थड्थड् उडत होत्या.

पाऊस अजूनही कोसळत होता. वाऱ्याचं थैमान चालूंच होतं. बिजलीचं नर्तन अजून थांबलं नव्हतं.

कड् कड् कडाड् अंतरिक्ष फोडून बिजलीनं खाली उडी घेतली क्षणमात्र कानठळ्या बसविणारा आवाज, आसमंत घुमवून गेला.

भयचकित शेवती माझ्या बाहुपाशात होती.

ती रात्र !

ती रात्र कशी गेली, हें मला समजलंच नाही

—— * ——

# श्री समर्थ बुक डेपो

## गिरगांव ट्रॅम नाका, मुंबई ४.

## आमच्या प्रकाशनाची यादी

| पुस्तकाचें नांव | | लेखक | रु. | आ. | पै |
|---|---|---|---|---|---|
| चौदा एप्रिल | कादंबरी | वि, वि बोकील | ५ | ० | ० |
| अपराध कुणाचा | | ना रा. अभ्यंकर | ४ | ८ | ० |
| व्यक्ति आणि अपेक्षा | ( व्यक्ति चित्रें ) | गो. भि. रानडे | २ | ० | ० |
| कॉन्ट्रॅक्ट ब्रिज | | ह. ल. केळकर | ३ | ० | ० |
| हिरे आणि निखारे | ( लघुकथा ) | र. ग. विद्वांस | २ | ० | ० |
| ससेमिरा | ,, | त्र्यं, वि. सरदेसाओ | २ | ८ | ० |
| पुनर्मीलन | कादंबरी | वि. श्री. जोशी | ४ | ० | ० |
| प्रेमवेडी | ,, | पां. गो. लोहोकरे | १ | १२ | ० |
| आमचा संसार | लघुकथा | र. गो. सरदेसाओ | २ | ८ | ० |
| सुख दुःख | ,, | उमाकान्त ठोमरे | ३ | ० | ० |
| गोड आठवण | कादंबरी | शांताराम आडिवरेकर | २ | ८ | ० |
| सिंधु लहरी | ( लघुकथा–निबंध ) | पां. गो, वेलणकर | १ | १२ | ० |
| तांडव आणि लास्य | ,, | बालशंकर देशपांडे | २ | ८ | ० |
| शिव्या आणि ओव्या | ,, | बालशंकर देशपांडे | १ | ४ | ० |
| पूर्तता | लघुकथा | र. वा. दिघे | ३ | ० | ० |
| राजाराणी | ,, | भा. वि. नाडकर्णी | २ | ० | ० |
| एल्गार | कादंबरी | श्री. ना. पेंडसे | ३ | | ० |
| पहिली भेट | ,, | सौ. शैला पाठक | १ | ८ | ० |
| नवें तें हवें | लघुकथा | रा. म. जोशी | | | |
| मोठीं वर्तुळें | ,, | वासुदेव पोवळे | ३ | ० | ० |
| जगूं आम्ही जीवन | ,, | शशिशेखर वेदक | ३ | ४ | ० |
| प्या आतां पोटभर | ( नाटक ) | अनंत फडके | | | |
| कान्होपात्रा | ( नाटक ) | टी. एस. कावले | १ | ८ | - |
| जगाला कळलें पाहिजे | कादंबरी | बी. रघुनाथ | ३ | ८ | ० |